# मधुलहरी

व

# अितर कविता

कै० माधव जूलियन्

प्रकाशक

व्हीनस बुक-स्टॉल, पुणें

# प्रकाशकाचे चार शब्द

कै माधव जूलियन् तथा प्रा मा त्र्य पटवर्धन, अेम् अे, डी. लिट् याच्या 'मधुलहरी व अितर कविता' हा कवितासग्रह प्रकाशित करण्यास आम्हास अत्यानद होत आहे त्याचबरोबर हा कवितासग्रह प्रकाशित झालेला पाहण्यास कै माधवराव हयात नाहीत, या विचाराने मन खिन्न होत आहे आनद आणि दु ख याच्या समिश्र भावना हा सग्रह प्रसिद्ध करिताना मनात घोळत आहेत कै. माधवरावाचा अेक चाहता म्हणूनच हे काम मुख्यत अगावर घेतले आहे. ते कितपत यशस्वी झाले आहे हे ठरविण्याचे काम वाचकावरच आम्ही सोपवितो

मधुलहरी, फटकळ अभग व अितर कविता याचा या पुस्तकात सग्रह केला आहे शेवटी मधुलहरीवरील कै माधवरावानी लिहिलेली टिपणेही जोडलेली आहेत मधुलहरीत जे शब्द ठळक अक्षरात छापलेले आहेत त्यावरील टिपणे शेवटी सापडतील

जिज्ञासु वाचकाच्या माहितीसाठी शेवटी कै माधवरावाचे त्रोटक चरित्र व त्याची ग्रथसपत्ति दिली आहे कै. माधवरावाचे छायाचित्र व त्याच्या हस्ताक्षराचा नमुना हाही देण्यात आला आहे अशा रीतीने पुस्तक शक्य तितके परिपूर्ण करण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे

कै माधवरावाचा हा कवितासग्रह छापण्यास परवानगी दिल्याबद्दल श्री लीलाबाअी पटवर्धन याचे आम्ही आभारी आहो. श्री. न चि केळकर याचा व कै माधवरावाचा अकृत्रिम स्नेह होता हे नव्याने सागण्याची जरूरी आहे असे नाही त्यानी या पुस्तकाची वाचकाना विनति-रूपाने ओळख करून दिली त्याबद्दलही आम्ही त्याचे आभारी आहो प्रा श के कानेटकर तथा कवि गिरीश व श्री. विठ्ठलराव घाटे, अेज्युकेशनल अिन्स्पेक्टर, मुबईभाग, याच्या सक्रिय सहकार्याशिवाय हे पुस्तक प्रसिद्ध करण्याचा मान आम्हास मिळालाच नसता त्याचे औपचारिक आभार मानण्याऐवजी आमची कृतज्ञताबुद्धि व्यक्त करणेच योग्य होअील श्री स. ल विपट यानी मुद्रणप्रत तयार करून मुद्रिते तपासण्याचे काम केले, त्याबद्दल त्याचेही आम्ही आभारी आहो महाराष्ट्राच्या पदरी रुजू केलेली ही अल्पसेवा वाचक गोड करून घेतील अशी आशा व्यक्त करून हे चार शब्द सपवितो

**स. कृ. पाध्ये**

# निवेदन

कै. माधवरावांचे ‘ मधुलहरी ’ हे फिड्झेरल्डच्या अुमरखय्यामचे भाषांतर १९२९ सालीच झाले होते, परंतु त्याचा कॉपीराअीट १९४० साली संपत असल्यामुळे ते लौकर छापता आले नाही १९३९ च्या ऑक्टोबर महिन्यात ते आपले हे भाषांतर व अितर कविता (त्या बहुतेक निरनिराळ्या मासिकातून प्रसिद्ध झाल्या आहेत) कोल्हापूरहून येथे घेअून आले त्यांचा हेतु यंदा हे भाषांतर व अितर कविता छापण्याचा होता, परंतु ते काम त्यांच्या हयातीत होण्याचा योग नव्हता ! !

कै. माधवरावांचे ‘ मधुलहरी ’ हे भाषांतर मूळाला धरून झाले आहे किंवा नाही हे पाहण्याचे काम माझे नाही त्याची योग्यायोग्यता विद्वान् ठरवितील

त्यांच्यामागे त्यांचा हा काव्यसंग्रह मी प्रकाशित करावा अशी माझी स्वतःची अिच्छा होतीच, परंतु त्यांचे जिवलग स्नेही रा. विठ्ठलराव घाटे यांनी मला अधिक प्रोत्साहन दिल्यामुळेच पुस्तक या वेळी प्रसिद्ध होत आहे

वास्तविक स्वतः लेखक हयातीत असताना हा ग्रंथ प्रकाशित झाला असता तर त्याला सुंदर प्रस्तावनेची जोड मिळाली असती. माधवरावांचे हेच पुस्तक असे दुर्दैवी ठरले की त्याला त्यांनी स्वतः लिहिलेल्या प्रस्तावनेची जोड नाही

ते विद्वान् पंडित व कवि म्हणून कितीही श्रेष्ठ असले तरी त्यांना आमरण अनेक टक्केटोणपे खावे लागले आणि शेवटी त्यातूनच त्यांनी आपला मार्ग काढला परंतु सुखाचे दिवस येतात न येतात तोच त्यांचा अंत झाला त्यांच्याच शब्दात सांगावयाचे म्हणजे —

**काव्याहुनी खचित जीवित होय थोर**
**पाही मजाच परि दैव कठोर घोर**
**काव्यास थांबुनि तरी जग देअि थारा—**
**गेला कवीश्वर बरा सुटला बिचारा.**

# पण्डितकवि माधवराव पटवर्धन

कै माधवरावाचा जन्म बडोदे येथे अेकवीस जानेवारी सन १८९४ रोजी झाला त्यानतरची नअू वर्षे त्यानी प्रथम भडोच, बडोदे वगैरे ठिकाणी व नतर पुणे जिल्ह्यातील मुळशी पेटचातील आवळस या आपल्या मूळगावी घालविली १९०३ मध्ये माधवरावाचा आवळस येथे व्रतबध होअून शालेय शिक्षणासाठी ते बडोद्यास गेले माधवरावाचे वडील त्र्यबक विनायक पटवर्धन हे सॉर्टरच्या कामावर असून त्याची नोकरी फिरती असल्याने माधवराव बडोद्यास आपले मामा श्री महादेव विश्वनाथ सहस्रबुद्धे याजकडे राहात असत बडोदा हायस्कूलमध्ये त्याचे शालेय शिक्षण झाले या वेळच्या त्याच्या स्नेह्यात श्री. विठ्ठलराव घाटे वगैरे मडळी असत १९०९ साली मॅट्रिक परीक्षा पसार होअून त्यात माधवरावाचा क्रमाक बराच वर आला लहान वयापासून माधवराव विचारवत होते. शाळेत असताना सस्कृत ही दुसरी भाषा घेण्याची आत्यतिक अिच्छा असूनही वडिलाच्या आग्रहास्तव माधवरावाना फार्सी ही दुसरी भाषा घ्यावी लागली. अर्थात्च त्या वेळी माधवरावावर लादलेली ही भाषा पुढे त्यानाच साहित्य-क्षेत्रात मानाचे स्थान देण्यास काही अशी कारणीभूत झाली ही गोष्ट निराळी.

माधवराव कॉलेजमध्ये गेले, परतु त्याच्या अगातील स्वातत्र्याचे वारे त्याना गप्प बसू देअीना घरात त्याच्या स्वातंत्र्यवृत्तीस वाव मिळेना. म्हणून केवळ जेवणासाठी मात्र घरी येअून अितर वेळा देवाच्या चाळीतील आपल्या खोलीत ते राहू लागले काव्याची आवड लहानपणापासूनच होती. अशा वेळी कॉलेजीय रम्य वातावरणात माधवरावाची प्रतिभा जागृत व्हावी यात आश्चर्य ते काय ? अत्यत बुद्धिमान, परतु लहरी अशी त्या वेळी त्याची ख्याति होती केशवसुत, विनायक, बालकवि, चद्रशेखर वगैरेच्या कविताची पारायणे करावयाची, सतत २४ तासपर्यत काव्यगायन आणि काव्यचर्चा याचे सप्ते करावयाचे, अशा प्रकारचा माधवरावाचा व त्याच्या स्नेह्यांचा

कार्यक्रम चाललेला असे अशा रीतीने १९१६ पर्यंतचा काळ घालवून त्या वर्षी माधवरावानी बी अे ची पदवी दुसऱ्या वर्गात येअून हस्तगत केली याच वेळी माधवरावानी आपले काव्यविषयक असे नवे नाव निर्माण केले 'गॉड्स् गुड मॅन' नावाची एक कादबरी वाचताना त्यातील जूलियन अँडर्ले नावाच्या एका पात्राने त्याचे मन आकर्षण करून घेतले जूलियन अँडर्ले ही व्यक्ति कवि व नाटककार होती त्यामुळे त्यातील जूलियन हे नाव आपल्या माधव या नावापुढे जोडून अेम् जूलियन या नावाने एक कविता माधवरावानी १९१६ साली जळगावच्या काव्यरत्नावलीत प्रसिद्ध केली आणि तेव्हापासून त्याचे ते नाव रूढ झाले या नावाव्यतिरिक्त अितर नावाने त्याचे साहित्य कोणी छापल्यास ते त्याच्यावर अत्यत रागावीत असत माधवरावाचे कॉलेजीय जीवन फारसे सुखाचे झाले नाही नाही म्हणावयास काव्यप्रिय स्नेह्याचा सहवास आणि स्वप्नरजन हे पुस्तक हाच त्याचा त्या वेळचा विरगुळा होता

अेम् अे च्या अभ्यासासाठी माधवराव बडोदे सोडून मुबईस आले आणि अेल्फिन्स्टन कॉलेजात नाव घालून शिकवण्या मिळवून त्यानी आपले अध्ययन पुढे सुरू केले दोन वर्षातच अेम् अे ची पदवी त्याना मिळाली आणि १९१८ साली लगेच पुण्यात फर्ग्युसन कॉलेजमध्ये त्याची अिंग्रजी व फार्सी भाषेचे प्राध्यापक म्हणून नेमणूक करण्यात आली झाले या घटनेने आपल्या आयुष्याच्या ध्येयाचा उदयकाल होअून आपले ध्येय आपल्यास गाठता येअील, आपले अध्ययन आपणास पुढे चालविता येअील, समाजाला सुधारणेचे धडे देता येतील अशा विश्वासाने माधवरावानी आपल्या पुण्यातील आयुष्यक्रमास सुरुवात केली परतु 'मनसा चिन्तित कार्यं, दैवमन्यत्र चिन्तयेत्।' माधवरावाचे हे जीवन, त्याचा हा बेडरपणा, त्याची ही रणझुंझार वृत्ति, याचे कौतुक फार वेळ टिकले नाही 'प्रणयपढरीचा वारकरी' या नावाने सबोधिल्या गेलेल्या माधवरावाच्या विरुद्ध काहूर उठले आणि त्याना फर्ग्युसन कॉलेजमधून राजीनामा द्यावा लागला त्याच्याविरुद्ध अनेक टीकास्त्रे पारजली गेली, जगातून त्याना अुठविण्याचे सहेतुक व अहेतुक प्रयत्न करण्यात आले, त्याना पुण्यात राहण्यास घर मिळेना, त्याच्या आकांक्षावर पाणी पडेल अशी भीति वाटू लागली होती, परतु माधवरावं

डगमगले नाहीत परराभव हा शब्द त्याच्या कोशात नव्हता त्याचे अत करण अत्यत अुदार होते फर्ग्युसन कॉलेजमधून ते बाहेर पडले, परतु त्या सस्थे-बद्दलचे त्याचे प्रेमच जणू काही पुढील ओळीद्वारे बाहेर पडले —

**सामान्य लोकदृष्टिचे हे प्रश्न सारे पाहतो**
**अन् गुडगुनी या मडगलीं कौतूहले मी राहतो**
**अन्याय तूं केलास तो होता किती मोठा तरी**
**त्याहून मोठें प्रेम हे आहे भरूनी अंतरी.** (मधुलहरी, पृ० ५५)

हे माधवरावाचे खरे हृदय ! हा त्याच्या अन्तरीचा थोरपणा असो. २८ ऑक्टोबर १९२५ रोजी त्यानी डेक्कन अेज्युकेशन सोसायटीच्या सभा-सदत्वाचा राजीनामा दिला

माधवरावाचा विवाह येथील सेवासदनाचे जनरल सेक्रेटरी श्री ग बा. गरुड याच्या कन्या गगूबाअी गरुड याच्याशी ता २९ मे १९२८ रोजी झाला. माधवरावाना साहजिकच लीलाबाअीबद्दल अतिशय अभिमान वाटत असे. आपल्याविरुद्ध कड्या अुठल्या असताना त्याच्या खोटेपणाबद्दल लीलाबाअीची खात्री करून देअून नतरच हा विवाह माधवरावानी केला श्री लीलाबाअी म्हणतात —" आमचे लग्न ठरवित्यानतर ते फिसकटविण्याचे काही लोका-कडून अनेक प्रयत्नही झाले होते पण माधवरावानी मला कधीही सशयात ठेविले नाही आपल्या जवळचे कागदपत्र दाखवून आपण किती निर्दोष आहोत हे त्यानी माझ्या बाबाना व मला पटवून दिले होते, आणि अितकेही करून मला नकार देण्यास मोकळीक ठेवली होती " (सह्याद्रि, जानेवारी १९४०, पृ० ४८)

१९२५ मध्ये डेक्कन अेज्युकेशन सोसायटीच्या सभासदत्वाचा राजी-नामा दिल्यानतर ते अमळनेरच्या प्रताप हायस्कुलात शिक्षक म्हणून गेले. तेथेही उत्कृष्ट शिक्षक व प्रेमळ मित्र म्हणून त्यानी लौकिक मिळविला. या वेळी त्यास दरमहा शभर रुपये वेतन मिळत असे याच वेळी त्याचा 'शलाका' हा काव्यसग्रह व फार्सी-मराठी कोश प्रसिद्ध झाला. अमळनेर-हून परत आल्यानतर त्याना पुण्यास भावे स्कूलमध्ये नौकरी व डेक्कन जिमखान्यावरील शाळेत राहण्यास अेक खोली मिळाली होती आतां ज्या

रस्त्यास 'प्रभात-रस्ता' असे नाव मिळाले आहे त्याच रस्त्यावरून माधवराव फिरावयास जाताना लेखकाने अनेकवार पाहिले आहे १९२८ जूनपर्यंत माधवरावानी ही नौकरी पत्करली होती या काळात विरहतरग, छदोरचना व सुधारक ही काव्ये त्यानी प्रसिद्ध केली माधवरावाच्या त्या वेळच्या अस्वस्थ अशा मन प्रवृत्तीचे प्रतिबिब या काव्यात पडले आहे या काव्यामुळे माधवराव हे एक चागल्यापैकी कवि अशा रीतीने ओळखू येऊ लागले

१९२८ सनामधील जूनमध्ये कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजकडून त्याना आमत्रण आले आणि त्यानीही त्याचा स्वीकार करून पुणे सोडले. त्यानतर १९३९ पर्यंत म्हणजे जवळ जवळ एक तप माधवरावानी कोल्हापुरात काढले अुमरखय्यामकृत रुबाया (१९२९ मे), द्राक्षकन्या (१९३१ ऑक्टोबर), गज्जलाजलि (१९३३ मे), मधुलहरी (१९३३ मे), विरहतरग द्वितीयावृत्ति (१९३३ जुलै), स्वप्नरञ्जन (१९३४ नोव्हेबर), छन्दोरचना (१९३७ जानेवारी), तुटलेले दुवे (१९३८ जानेवारी), भाषाशुद्धिविवेक (१९३८ अेप्रिल), पद्यप्रकाश (१९३८ नोव्हेबर), नकुलालकार (१९३९ मे) वगैरे त्याचे काव्यसग्रह, प्रबध वगैरे ललितविलास याच कोल्हापूरमधील वास्तव्यात प्रकाशित झाला

नाशिक येथे भरलेल्या महाराष्ट्र कविसमेलनाचे अध्यक्षस्थान (१९३३ सप्टेबर), बडोदे येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसमेलनाच्या काव्यविभागाचे अध्यक्षस्थान (१९३४ डिसेबर), बडोदे दरबारकडून साहित्यसत्कार (१९३५ मार्च), जळगाव येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसमेलनाचे अध्यक्षस्थान (१९३६ नोव्हेबर), फलटण दरबारकडून साहित्यसत्कार (१९३९ अेप्रिल), डॉक्टर ऑफ लेटर्स ही पदवी (१९३९ फेब्रुवारी १५), हे सर्व बहुमान कोल्हापूरच्या माधवरावाना मिळाले—ज्या पुण्यात माधवरावाना राहावयास जागा मिळत नव्हती त्या माधवरावाना मिळाले; आणि ज्या माधवरावानी महाराष्ट्र कविपरपरेची मशाल अधिक अुच धरली, ज्याच्या चारित्र्याची आणि प्रतिभेची मशाल आजही हजारो तरुणाना नवचेतना देत दिमाखाने मिरवीत आहे त्या माधवरावाना मिळाले.

जेथे जेथे माधवराव जातील तेथे तेथे कविमडळे स्थापून काव्यें रचून आणि लोकाना रचावयाला सागून माधवरावानी कवित्वाचे लोण सगळीकडे पसरविले वडोद्याला लहानपणी भरविलेले काव्यगायनाचे चक्री कार्यक्रम, पुण्यातील रविकिरण मडळ व सुपारी क्लबाची स्थापना, अमळनेरचा मित्र-समुदाय, कोल्हापूरची साहित्यसस्था या त्याच्या वैशिष्टचाची साक्ष देतील· कोल्हापूरला मात्र पुढे पुढे त्याची प्रकृति खराब होअ् लागली कोकणचे कडे उलटेपालटे करणारे आणि खानदेशच्या धुळीची धूळदाण करणारे माधवराव सुटीत पुण्यात निवान्त बसत होते. त्याच्या अतरीची तळमळ हेच त्याचे जीवन झाले होते शेवटच्या आजारीपणात तर अितरापेक्षा त्याचे मनच अधिक खबीर बनले होते

"पुढे अेकदा असा काल येअील की, जेव्हा मराठी कविता आपल्या ज्ञानाची तुतारी वाजवू लागेल व त्यातून निघणाऱ्या जोमदार सुरानी हें भरतवर्ष खडबडून जागे होअील आणि मग येथील प्रत्येक वस्तु—ती डोळचास जिवत दिसो अगर न दिसो—सुधारणेचा किल्ला सर करावयासाठी हिदुस्थानाच्या अत शक्तीस मदत करू लागेल" अशी १९१२ सालामध्ये गर्जना करणारे माधवराव शेवटपर्यंत तेच कायम होते आपल्या आयुष्याशी झगडत झगडत, सकटाचे डोगरचे डोगर ओलाडून जात जात यशोमदिराच्या अत्युच्च स्थानापर्यंत ते पोहोचले, आणि मगच त्यानी सुटकेचा नि श्वास टाकला माधवराव थोर होते, श्रेष्ठ होते, परतु ते होते असा भूतकाळवाचक प्रयोग करण्याचे लेखकाच्या नशीबी आले आहे २९ नोव्हेबरच्या रात्री नित्याप्रमाणे त्याच्या बगल्यावर फेरी मारण्यास गेलो असताच अश्रूनी भारावलेल्या डोळचानी गिरीशानी हुदके देत देत 'जास्तच आहे' असे सागितले, आणि दुसऱ्याच दिवशीच्या वृत्तपत्रात येअू नये ती बातमी आली. माधवराव वारले आणि महाराष्ट्र काव्यरसवती पोरकी झाली ती अनाथ झाली कोदणातील हिरा गेला म्हणजे कोदण ओके ओके दिसते, भकास दिसते २९ नोव्हेबर १९३९ रोजी महाराष्ट्र वाक्देवीलाही तसेच वाटले आणि त्याच दिवशीं माधवरावाची ही जीवनकथा सपली

परतु माधवरावाची जीवनयात्रा सपली तरी त्याचे वाङ्मय अमर आहे. आणि ते अमरच राहणार लोकशिक्षण (फेब्रुवारी—मार्च १९४०),

सहयाद्रि (जानेवारी १९४०) व ज्योत्स्ना (मे १९४०) या मासिकानी व इतर नियतकालिकानी 'माधवराव पटवर्धन विशेषाक' प्रसिद्ध करून त्याच्या-बद्दलचा व त्याच्या काव्याबद्दलचा आपला जिव्हाळा व्यक्त केला आहे. प्रा रा श्री जोग यानी अेके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे--पटवर्धनाची कविता सर्व प्रकारच्या रसिकाचे समाधान करू शकेल स्फुट आत्मलेखात्मक भाव-गीतावर ज्याची भक्ति आहे त्याना 'स्वप्नरजन' रिझवू शकेल प्रदीर्घ रचनेखेरीज कवीच्या सामर्थ्याची जाणीव ज्याना होत नाही त्याना 'सुधारका' दि मोठी काव्ये आवडतील पाडित्यप्रकर्ष किवा खोल गभीर विचार वाचल्यावाचून ज्याच्या बुद्धीस काही श्रम केल्यासारखे वाटत नाही, त्यानी 'विरहतरग' वा 'तुटलेले दुवे' एकदा अवश्य वाचावेत. स्वभाव-लेखन हेच कलेचे मर्म समजणाऱ्यास 'सुधारक' किवा 'नकुलालकार' यात भरपूर सामग्री मिळेल उत्तान प्रेमभावनामध्ये गुगणाऱ्या जीवास 'गज्जलाजलि' प्रिय होअील, तर प्रेमाचे खोल तत्त्वज्ञान 'विरहतरग' वा 'तुटलेले दुवे' यात वाचावयास मिळेल" **'मधुलहरी व अितर कविता'** या काव्यसग्रहात माधवरावाचे काव्यविषयक सर्व गुण अेकवटले आहेत अेवढेच सागितले म्हणजे कार्यभाग होअील गिरीशानी म्हटल्याप्रमाणे ज्या माधवरावाच्या काव्यात "कालिदासाची मनोव्यापकता, भवभूतीची भाव-शीलता, शेलीची काव्यात्मकता, 'चद्रशेखरा'ची घोटीव सुदरता, मम्मट-पिगलाची विद्वत्ता, व चिपळूणकराची भाषातरप्रियता हे सारे गुण अेकवटलेले होते त्या माधवरावाच्या काव्य शैलीचे वर्णन कोण करू शकणार?" 'दुबळ्याचा न्याय' ही या सग्रहातील अेक कविता पहा सर्जेराव नावाचा पाटलाचा बेटा अनाचार करू लागला त्याच्या अत्याचारामुळे चिडून जाअून लोकानी त्याला मारले परतु शेवटी—

**परि ही चीड ओसरुनि जातां**
**होतिल क्षणि मेण्ढ्यापरि आता**
**सोसाया पुनरपि कष्टुनि नमवुनि माथा।**

मानवी स्वभावाचे किती सुदर आविष्करण आहे हे! फटकळ अभगातही माधवरावानी विठोबारायाचे चागलेच डोळे अुघडले आहेत.

पूजा, प्रार्थना वगैरे बाह्योपचाराचा देवाला त्याग करावयाला सांगून माधवराव म्हणतात—" क्षितिजा भिडवा कर्तृत्वाची सीमा पण्ढरी-महिमा त्यात आला !" (पृ० २९) अेका लहान मुलीला सायकलीचा धक्का लागल्याबरोबर कवीचे मन तळमळले परंतु त्याच क्षणी त्याला आपल्या मुलीची आठवण झाली आपल्या मुलाचा हट्ट पुरविण्याऐवजी त्याच्यावर रागावल्याबद्दल कवीचे मन हेलावले अेक ना दोन, प्रत्येक ओळीत प्रसाद, माधुर्य व ओज हे काव्यगुण अेकवटलेले दिसून येतात काव्याच्या ओळी-अैवजी माधवरावाच्या स्वभावाचे निरनिराळे नमुनेच आपण पाहात आहोत, त्याच्याबरोबर आपण हसत आहोत व त्याच्याबरोबरच दीनदुबळ्या-बद्दल सहानुभूति वाटून आपल्या डोळ्यातून अश्रु ठिपकत आहेत असा स्वत:ला साक्षात्कार होतो. माधवरावाच्याच शब्दात सांगावयाचे झाल्यास —

**" सामान्य लोकदृष्टिचे हे प्रश्न सारे पाहतों**
**अन् गुगुडनी या मगली कौतूहले मी राहतों "**

## कवि माधव जूलियन यांचें हस्ताक्षर

हो चन्द्र लोलाद्रिंत आहे तुज मना भेटण्या,
ओठांत कितीदां वृत्ति-हास्य शरीरीं या,
त्यापुढें कितीदां उगवुन या उजळीं
हृदयांत उमलतें — पण ओठांत नये!
अहं रसिक स्वभावें अतिसुन्दर मधुरावें!
ये हृदय शाकुन्तलामधीं गौर पायांनो
तिज मधुकणीं तूं नयनींतल मनस्वी सूक्त
तूं लावण्यपूर्ण कर चंचल रेला या स्थानीं!

समाप्त

पुणें सप्टेंबर १९२८ माधव जूलियन

# अनुक्रमणिका

# १. मधुलहरी

१ बघ अूठ ! सूर्य सर करी रात्र-मैदान
अुडवून अुडूची पुरती दाणादाण,
पळवूनि नभांतुन निशेस त्यासह, मारी
सुल्तान-मनोऱ्यावर किरणाचा बाण.

२ जों लुप्त न होअी मिथ्या प्रभात-भास,
तो गमे अश्रणी पिठ्यातून ये खास,
"देअुळीं सिद्धता सारी झाली असतां
बाहेर पेङगतो भक्त अजून कशास ?"

३ अरवतां कोम्बडा, पिठ्यापुढे जे फार
तिष्ठले, म्हणाले—"मग अुघडा की दार !
जाणतां अल्प किति वसती अमुची येथें
अन् गेलों म्हणजे परत कधी येणार ?"

४ नवरोझ अतां पुनरुदित करी गत आस,
अिच्छिती मनन-पर जन विजनांत निवास,
दाखवी विशद कर जेथे मोशे विटपीं
अन् सोडी भूमींतुन येशू अुच्छ्वास.

५ तें अिरम खरोखर जाय कुठे, न ज्ञात,
जम्शीद्-चषकही ज्यावर वलयें सात;
विलसती माणिके द्राक्षीवर परि अजुनी
अन् नहर-तटाकीं बाग किति‌क फुलतात.

६ हो कधिच बद्धमुख दाविद् कविचण्डोल,
परि बुल्बुल दैवी अुच्च पल्लवी बोल

अजि वदे गुलाबाप्रति "घे मधु! मधु लाल!
अन् लालबुन्द कर अपुले पाण्डु कपोल."

७ ये, भर प्याला, कुसुमाकर-होळित टाक
वैराग्य-वस्त्र तव शिशिरांतील वराक,
नच दूर जायचें अुडुन काळ-पक्ष्याला
अन् पहा पसरले असती त्याने पांख.

८ बाबेल, निशापुर, नजर—कुठेही फेक
हो चषकीं कटुचा वा मधुचा उद्रेक,
बघ जाते झरुनी थेम्ब थम्ब भव-मदिरा,
पडतात गळुन भव-तरुपर्णें अेकेक.

९ प्रत्युषा आणिते म्हणशि गुलाब हजार
हो खरे, कुठे पण हरी कालचा बार?
मधुमास हा सवें गुलाब आणी, हाच
न कैकुबाद्-जम्शीद् हरूनी पार.

१० नेअु दे हरुन तो खुशाल त्यांना कोठे!
अपणांस काय जरि कुबाद्-खुस्रव मोठे?
घालुं दे धुमाकुळ यथेच्छ रुस्तुम-झाल
देअुं दे निमन्त्रण ह्यातिम-विसर, नको तें!

११ चल मजसह शाद्वल-पटीं कुठे अेकान्तीं
ओसाडी-शेती यांची जणु सीमा ती,
नाठवे नावही गुलाम-सुल्तानाचे—
महमूद सुवर्णासनीं वरो मग शान्ती!

१२ छायाळ तरुतळीं अेक वही कवितेची,
भाकरी अेक अन् सुरअी अेक सुरेची,
आणखी अेक तूं जवळ गात त्या बिजनीं,
अन् तें न रान मग नन्दनवन तें तेंची!

१२अ का अविचार न हा—कोळ्यापरि सायास
अिहजीवितत‍न्तू काढुनि करणें नाश ?
अन् काय साधण्यास्तव ? न कळे आम्हां की
सोडितां ये न ये आंत घेतला श्वास !

१३ अिहविभवासाठी कुणी टाकिती प्राण,
तर भावी स्वर्गासाठी कुणि (कोणी) आन;
हां, अुचल रोख, जाअुं दे वायदा वाया !
दुमदुमो दुन्दुभी दूर, दे न अवधान !

१४ अुत्फुल्ल सुगन्धी गुलाब-कलिका बघ ती,
ती म्हणे, "पहा, मी हसत विकसते जगतीं.
क्षणि फीत रेशमी फेडुन मम पिशवीची
बागेवर देते अुधळुन दौलत मग ती."

१५ जो पर्ज्यन्यापरि अुधळी धन चौफेर,
जो सुवर्ण कण कण जमवी—पहा अखेर
नच दोघांच्याही मातीचे हो सोने
जें होतां भूगत काढिल कुणि बाहेर.

१६ ज्या अिहसौख्याशेवर मन लोभावें
ती खाक होय वा बहरांतच फोफावे;
अन् क्षणी मागुनी रुक्ष रणीं हिम जैसे
घडि दो घडि विलसुन अन्तर्धानच पावे.

१७ बघ तू या पडक्या पडशाळेंत जुनाट,
अुघडतें क्रमें यद्वार—दिवस वा रात,
सम्राटामागुनि सम्राट् किति थाटांत
राहून नेमिली घटिका धरिती वाट !

१८ कृकलाश-केसरी आज टाकिती अङ्ग
ज्या महालांत जम्शीद करी मधु-रङ्ग,

बहिराम शिकारी थोर—गौर अजि तुडवी
शिर त्याचें, परि करुं न शके निद्राभङ्ग.

१८ अ टेकलें जयाच्या स्तम्भावर आभाळ,
टेकीत अुम्बऱ्यावर ज्याच्या नृप भाळ,
त्या प्रासादीं मी बघे पारवा अेक
आक्रोश करी तो 'कू-कू-कू' बहुसाळ

१९ कधि कधी गमे मज फुले गुलाब सुरक्त
साण्डले नृपाचे रक्त त्या स्थळीं फक्त;
अन् पूर्वसुन्दरीपासूनच अुगवूनी
अुद्यानोत्सङ्गीं अिन्दीवर हो व्यक्त.

२० पाटाच्या ओठीं हिरवळ अभिनव गार
टाकितो जिच्यावर रेलुन आपण भार—
हुं ! हळूच रेला ! गूढपणें उगवे ही
कोणाच्या न कळे ओठांतुन सुकुमार !

२१ भर आज लाडके तो प्याला विलप्यार
घालवी भावि-भय, भूतशोक जो पार;
का अुद्या ? अुद्या मी पडेन जेथे गेलीं
गर्तेत कालच्या वर्षें सात हजार.

२२ हा ! जिवलग अमुचे ते उत्कृष्ट सुकान्त
चरकांत पिळुन घे ज्यांस काल हा भ्रान्त;
मधु—वारीं पिअुनी चषक अेक वा दोन
अेकेक जाहले ते मधु-विलयीं शान्त.

२३ अन् त्यांनी त्यजिल्या स्थळीं रङ्गतों आम्ही,
कुसुमाकर चढवी साज जयावर नामी,
भूशय्येखाली जाणें न सुटे आम्हां
शय्याच व्हावया स्वता—कुणाच्या कामीं ?

२४ हां! सन्धि असे तों घे साधुन अत्यन्त
पडलों न आपणहि धुळींत जोंपर्यन्त;
आहेच पुढे भू-गर्भी मृण्मय पडणें
जेथे न गायिका, न गीत, न मधु—न अन्त!

२५ राहती आजच्या गढुन जे व्यवस्थेंत
वा काहीतरि तो वेध उद्याचा घेत,
दोघांस बाङग ये तिमिर–मनोऱ्यावरुनी—
"मूढांनो तुमचें फल न येथ, नच तेथ!"

२५अ ध्वनि दुसरा येओ असतां मी स्वप्नस्थ,
की "फूल फुलावे अुषेसङगतीं स्पष्ट;"
अन् जागृति येतां ये क्षीण स्वर कानीं,
"अेकदां फुले सुम, मग कायमचें नष्ट."

२६ मुनि-साधु ते जयां अिह-पर-वादच्छन्द
त्यां मिळुन गचाण्डी दूतांपरि मतिमन्द
होऊन तिरस्कृत शिष्टाओी, तोण्डांत
मातीच पडुन ती तोण्डें होतीं बन्द.

२७ गुरु करुन शिशुपणीं शास्त्रि-सन्त कितिदा रे
अैकिलें कौतुकें प्रमाण-चक्रक सारें
फिरफिरुनी भवति न् भवति द्वारें त्याच
बाहेर निघें मी रिघें आंत ज्या द्वारें.

२८ त्यांसवे पेरुनी ज्ञानबीज मी पाहीं,
रुजवींही त्याला कष्टुन निज हस्तांही
अन् लाभे सारें हेंच अेक फळ—कळलें
"ये पाण्यापरि मी अन् पवनापरि जाओी."

२९ या विश्वीं मी कां, कुठून तें अज्ञात,
परि सलिलापरि ये अनिच्छ्याच वहात;

बाहेर कुणिकडे जाअी, तेंहि कळेना
परि अनिच्छया जणुं माळावरचा वात.

३० द्रुत बळें आणणें अिथें कुठून कशाला?
नेणेंहि न पुसतां कुठें अिथून कशाला?
चल या धाष्टर्याची स्मृति बुडवुन टाकाया
त्या निषिद्ध मधुचा दे प्याल्यावर प्याला!

३१ भूमध्यापासुन भेदुन वेशी सात
मी चढलो शनिच्या तख्तावर थाटांत;
बहु कूट ग्रन्थी सोडविल्या वाटेने,
परि अदृष्टाची नच सुटली गुरु-गाठ.

३२ मज न मिळे चावी, तेथे बन्द कवाड;
जवनिका तिथे मी बघुं न शके पैलाड;
क्षण गमे अैकुं ये मी-तूची लव चर्चा,
मग कुठचे मी-तू? पुन्हा शून्यता गाढ.

३३ अुत्तरूं शकेना भूमि, नील दर्याही
प्रभु-वियोगशोकें जो कल्लोलत राही,
अन् भ्रान्त गगनही, ज्यावरच्या चिन्हांना
नित दावी लपवी निशा-अुषांची बाही

३४ 'मी-मधील-तू'ते जोडी मी मग हात—
—कळसूत्रधार जो कार्य करी पडद्यांत—
"दे दीप मज तमीं" तों बाहेरून कानीं
"'तू-मधील-मी' तर अन्ध" शब्द पडतात

३५ मी बघे मग मुखीं मृत्कुम्भाच्या दीन
की होअिल जीवन-रहस्य केवि अधीन;
कुजबुजे मुख मुखीं भिडवुन तो, "आजीव
मधु पी की मरतां पुनरागमन कधी न."

३६ दे अुत्तर घट जो क्षीण-स्वर मधु-शील
घे मजा लुटुन तो गमे जीवनांतील,
मी अधर चुम्बिला सदासिद्ध तो पुढती
किति किती चुम्बने घेअील अन् देअील !

३७ आठवे अेकदां फिरत थाम्बलों हाटीं
कुम्भार बघत, जो तिम्बी ओली माती;
अन् क्षुण्ण जिभेने ती पुटपुटली काही—
"हळु जपून भाई! जपून हलक्या हातीं!"

३८ अन् कथा नसे का परम्परेने आली
की अगदी पूर्वी फार पुरातन काळीं

या अशाच ओल्या मातीच्या गोळयाची
स्रष्टयाच्या हस्ते मानवमूर्ति जहाली?

३९ चषकांतुन भूवर तीस कराया तृप्त
मधु-बिन्दु टाकितां होय क्षणी तो लुप्त,
अन् शमवी जळजळ डोळयांतील कुणाच्या
जो पडे कधीचा भू-गर्भी चिर सुप्त.

४० घ्यावया मधूषःपानीं दैवी हाला
बघ सुमन करुन मुख वर विनवी गगनाला;
भक्तिने हेच कर तू, न करी तुज नभ जों
भूतलीं पालथा जसा रिकामा प्याला.

४१ यापुढे न होतां ज्ञान-कर्म-सम्मूढ
वाऱ्यास निरव तू बिकट अुद्याचें गूढ;
अन् फिरव अपुली अङ्गुलि सरुतन्वङ्गीं
(अन् खुशाल अपुलीं बोटें दे अडकवुनी)
साकीच्या सुन्दर कचपाशांत सु-रूढ.

४१अ हा देवदयेने लाभे तुज सुमुहूर्त

सरु-मूर्ति चपल ही धर परिरम्भीं तूर्त
जोंवरी न अन्त्याश्लेषीं निजकरपाशीं
भू-माता न करी तूज विलीन अमूर्त.

४२ सेविशी अधर-मधु;—जर ही जातिल पार
आद्यन्तीं पावे जिथे विश्वसंस्सार—
होतास काल तें जाण आज असशी तू
अन् अुद्या न्यून तुजमधे लव न पडणार.

४३ जरिअ देवदूत तो काळ-जळाचा 'साकी'
दे चषक गाठुनी अखेर सिन्धु-तटाकीं,
प्राणांस बोलवी कण्ठीं घ्याया घोट,
तरिअ नको डगमगू, घे तो, पिअुनी टाकी!

४४ मृद्वसन फेकुनी करूं शके जर आज
अम्बरीं दिगम्बर हंस्स अुच्च 'मिअराज,'
मृत्पञ्जरांत या पङ्गु होअुनी पडणें
विहगास नसावी का याची तर लाज?

४५ ही निवळ राहुटी दिनभर जींत निवास
नृपपान्थ करी जो निघे मृत्युलोकास;
नृप अुठतां मागुन नव्या अुतारूसाठी
तिज पाडुन पुनरपि अुभवी श्याम फ़रास

४६ अन् जिवितास हीं अपुलीं खातीं बन्द
झाल्यास अशीं दिसतील न, नको ती खन्त!
अब्जावधि बुद्‌बुद अपुल्यापरि चषकांत
पाडीतचि राही साकी अनाद्यन्त.

४७ अन् तू मी होता पडद्याआड पसार
हो, असेंच जग परि दीर्घकाल अगणार;

लागल्या खड्याच्या जितका सागर तितका
जग करी अपुल्या ये-जाचा बडिवार.

४८ थाम्बणें क्षणच अन् रुक्ष रणाच्या ठायीं
कूपांतील जीवन पिणें क्षणच सुखदायी—
अन् पहा, पोचली दिसे भूतयात्रा ही
जेथून निघे त्या शून्यीं—हूं! कर घाओ!

४९ त्या गूढशोधनीं जर असशील तयार
तर वेचच नलिनीदलगत जीवन यार!
बघ भेद कचाग्रच ऋतानृतांत कदाचित्
अन् साङ्ग कशावर बरे जीवनाधार?

५० हो! करी कचाग्रच सत्यासत्य विभाग,
अन् अेक अकारच जर का दाविल माग
—गवसल्यास—कोठेतरि त्या धन-कोशाचा,
अन् कधी कदाचित धन्याचाहि बेलाग;

५१ अस्तित्व जयाचे न दे लागु तुज ठाव
घे सृष्टिवाहिन्यांतुन पान्यापरि धाव,
आ-शेष-शशी घे रूपें विविध, पुढे जीं
बदलतीं, नासतीं—त्याचा अव्ययभाव;

५२ क्षणभरच भास तो!—पुनश्च तिमिरीं गाढ
तें नाटक सरतां जाणें पडद्याआड,
जें स्वताच योजुन तो करवूनी पाही
घ्यायास सदाची करुन करमणुक वाढ.

५३ लाविशी वृथा टक मूक भूतळीं खाली
अन् गगन कपाटीं बन्द बरी भवताली—
जर आज तुझी ही गति हो तू तू असतां,
तर तू तू नसतां काय अुद्याच्या काळीं?

५४ घडि नको गमावूं, क्रमीत हा तो पन्थ
किति करशिल वाया विवादकष्ट अनन्त ?
बघ सुरासङ्ग किति अमोघ सुखद पसन्त
फल कटु ये, नच ये ही करण्याहुनि खन्त !

५५ जाणतां मित्र हो, येअी काय बहार
जंअि पुनर्विवाहीं साधी मी मधु-वार !
जंअि टाकुन देअुन बुद्धि—वान्झ ती वृद्धा
मी द्राक्षसुतेशी करी सुरू संस्सार.

५६ मी अस्ति-नास्तिचा वाद सरेषा-लेख
अन् अधोश्चोर्ध्व-गति-भाष्य सयुक्तिक देख
करुं शकतों, माझी तरी गम्यविषयींही
तितकी न खोल गति जितकी—मद्यीं अेक.

५७ जन म्हणती की मी करुन गणित बहुसाल
बिनचूक ठरविले सौर-वर्ष किति काल;
मी पञ्चांगांतुन फक्त खोडुनी टाकी
ती अुद्या अजातच आणिक तो मृत काल.

५८ नुक्तीच पिठ्याच्या दारांतून सताड
ये विलसत सन्ध्या तिमिरांतून अगाढ
कुणि दिव्य सुराऽऽकृति, कुम्भ घेअुनी स्कन्धीं
मज म्हणे “चाख, घे ! ” काय ?—तो सुरास्वाद.

५९ घ्या प्रमाण दावुनि मधु गुणवन्त (बिनतोड) बुरन्त
हा करी निरुत्तर भिन्न बहात्तर पन्थ,
अन् करी सुवर्णच जीवित-जड-धातूचें
निमिषांत अेक हा किमयागार महन्त !

६० वा महमूदच हा रणगाजी सुल्तान
जो शोकभयांची काफिर-धाड तुफान

जीवावर उठतां खड्गप्रभञ्जनानें
तिज उधळुन लावी करुनी दाणादाण.

६१ विधिनिर्मित जर तर या लताङ्कुरास
पाखण्ड नसे का गणणें किल्बिष-पाश
देणगी पथ्यकर जर तर सेवुं नये का?
दे मूळ कोण हिज, जर करूं बघे (ही) नाश?

६२ मज हवा त्यजाया हा जीवन-मधु पाक
त्या भावि परीक्षेचा मनिं धरुनी धाक
वा आस दिव्यतर पेयाच्या चषकाची
पण केव्हा? होऊन गेल्यावर मी खाक?

६२अ प्रेषितोक्त नियमें व्हायाचे स्वर्गस्थ
जन मद्यप्रेमत्यागी मात्र, न मस्त;
परि वाटे शङ्का, हाय हाय! बेहेस्त
राहील रिकामा जसा रिक्त हा हस्त.

६३ का नरकभीति ही वा स्वर्गाची आस?
हे अेकच निश्चित, होय आयुचा ऱ्हास;
हें अेक सत्य अन् वरकड मिथ्या भास,
अेकदाच विकसन, नाशच मग पुष्पास.

६४ किति विचित्र तरि हें!—लङ्घुन तिमिरद्वार
जन गेले आधी पुढे कितीक हजार,
परते न अेकही कुणी वाट साङ्गाया,
जाणण्यास जाणें पडे स्वता लाचार.

६५ अीश्वरी प्रेरणेने ज्यांचा सञ्चार
ते ज्ञानी भाविक, त्यांचे साक्षात्कार
स्वप्नेंच वस्तुता जीं झोपेंतुनि उठुनी
ते गड्यांस साङ्गुन गेले झोपीं पार.

६६ आत्म्यास म्हणे मी, "वर अव्यक्तीं जाच,
मरणोत्तरगतिचें लेखाक्षर तरि वाच;"
तो जाअुन परतुन येअुन कालावधिने
मज म्हणे "स्वर्ग मी आणि तपन मी साच!"

६७ कामनापूर्तिचा प्रकाश म्हणजे स्वर्ग,
अन्, हुताश मनिची छाया म्हणजे नरक,
दोन्हीहि भासमान् होती गुढाकाशीं
वर निघुन ज्यांत क्षणि व्हावें लागे गर्क.

६८ अन् आपण छायाचित्रें मात्र असार
जीं येतीं जातीं भ्रमुनी चक्राकार
आकाश-कन्दिलीं भानुज्योतीभवती
लावून निशीथीं जिस दे मायाकार;

६९ या दीन सोङ्गट्या; खेळ करी पण देवी
या कृष्ण-धवल दिनरात्रिपटावर केवी!
त्या अिकडे तिकडे फिरवी जुगवी मारी
अेकेक अुचलुनी झोळण्यांत त्यां ठेवी.

७० बघ चेण्डु करीना कधि 'हो' 'ना' ची बात
खेळाडु टोलवी तिकडे राही जात;
तुज अुजवी-डावीकडे दवडवी क्षेत्रीं
हें त्यासच सारें ज्ञात, त्यासच ज्ञात!

७०अ ते म्हणोत शास्त्री विद्याकलाप्रवीण,
की राहे अमुकच, तमुक न, अिच्छाधीन;
ते स्वताच असती दुवे शृङ्खलेचे त्या
चुकविण्या तोडण्या जीस समर्थ कुणी न.

७१ ती फिरती अङ्गुलि लिही, लिहीतच राही,
कर खर्च साधुता, सारी विद्वत्ताही;

पण मोह पावुन न पङ्क्त्यर्धहि खोडिल ती,
शब्दही न पुसला जाय अखिल बाष्पांही.

७२ तो अुपडा प्याला, म्हणती नभ ज्याला रे,
फरपटतों मरतों ज्यांत डालले सारे—
करं नको हात वर मागाया तत्साह्य
तें फिरे बघ तुझ्या माझ्यापरी बिचारें.

७३ तिम्बिली आद्यदिनिं अन्य नराची माती,
अन् अन्य पिकाची हो पेरणी तदा ती;
हो वाचन ज्याचे न्यायदिनीं प्रलयान्तीं
हो त्याचे लेखन पूर्वी सृष्टि-विभातीं.

७४ हें वेड आजचें कालच करी तयार
निर्वाण अुद्याचें, जयापजयहि असार—
पी! न कळे तुजला येशी का कोठुन तू,
पी! न कळे तुजला का कोठे जाणार!

७५ साङ्गतों अैक तू—यदा सुरू हो सृष्टी
अन् बालनभाच्या तेज तेजिच्या पृष्ठीं
आरूढ जाहलीं गुरु-कृत्तिका दोघें,
मम आत्म-क्षेत्रीं तदा दैव-सङ्कृष्टीं

७६ द्राक्षीसच फुटला अङ्कुर; अजुन जिवास
हा बिलगे जर तर—करो शेख अुपहास—
कधि घडितिल किल्ली याच हीन धातूची,
अुघडील दार ती, रडेल तोच निराश.

७६अ जर शिथिल मतांचें सूत घेअुनी नीट
मी बसलों सत्कृति-मण्यांत तें ओवीत
तर टळो दोष तो की अेकाचे दोन
करणें ही माझी नसे रीत विपरीत.

७७ सज्ज्योति करो ती कोपें जाळुन घात
या प्रेमें अुजळो, मला कळे ही मात
—देवळांत जाअुन तीस सर्वथा मुकणें
क्षणदर्शन त्याहुन बरे जरी गुत्त्यांत.

७८ का अजाण शून्यामधुनी भूत सुजाण
निर्मुनी तयाची द्यावी गोवुन मान
सुख-निषेध-पाशीं, ज्यास तोडितां त्वेषें
आहेच दण्ड मग उदण्ड, खण्ड जया न!

७९ का दीन नराला देअुन हीन अुधार
मागावें बावनकशी परत साचार,
ऋण न घे स्वेच्छया, फेडूं न शके त्याची
लावावी निकडहि—हीन किती व्यवहार!

८० पथ मी जाण्याचा तूच ठरवुनी साचा
निर्मिशी सापळे त्यावर आणिक खाचा;
मज करुनी दैवायत्त पुन्हां म्हणशी का
"तव अधःपात हा विपाक तव पापाचा?"

८१ तूं अधम मृत्तिकेचा घडवुन आदाम
निर्मिला सर्प अेदेनवनीं मुद्दाम;
नरमुखीं काळिमा आणी पाप तयाची
दे नरास माफी, मग घे! आणि सलाम!

८२ जंअि दिनान्त-तिमिरीं लपत छपत रमझान
अुपवास कृश तो पावे अन्तर्धान
तंअि पुन्हा अेकटा स्थित कुम्भार-घरीं मी,
विविधाकृति पात्रें भवती थोर लहान.

८३ तीं सान थोर किति, तऱ्हा किती आकार!
किति भुअिवरच, किति भिन्तीशीं साधार,

वाचाळ कुणि, कुणी श्रवण करीत कदाचित्
परि करीत न कधी अगदी शब्दोच्चार.

८४ तों वदे अेक, "मद्द्रव्य खरोखर आधी
मृत्तिकेपासुनी वृथा न तो सम्पादी
की असे दिल्यावर रूप पुन्हा तुडवूनी
बनवावी त्याची पुनश्च माती साधी."

८५ तों वदे अन्य, "का चषक पोर चिडखोर
फोडील ज्यांतुनी पिअी मजेने थोर ?
मग जयें स्वहस्ते घडिले पात्र असे तो
फोडणार नाहिच पुढती कोपें घोर."

८६ झाल्यावर नन्तर पळभर शान्त समस्त
बोलला अेक जो कुरूप अस्ताव्यस्त,
"मज हसती अष्टावक्र बघुनि, घडितांना
कां कम्पित झाला कुम्भाराचा हस्त ?"

८७ तों गरम होअुनी त्या वाचाळ समाजीं
कुणि गडू—असावा सुफी—म्हणे तो, "आजी
ही काय घटाची, घट-काराची चर्चा ?
कुम्भार कोण तो ? कुम्भ कोण ? बोला जी."

८८ "तो" वदे अन्य "कुणि म्हणती असा असे कीं
दुर्दैवी पात्रें तो तपनांतच फेंकी
जीं स्वताच त्याने बिघडविलीं घडितांना—
छे ! भला गडी तो, करिल गोमटें शेखीं."

८९ तों "कुणिही घडवो, घेवो !" स्वर ये क्षीण,
"चिरविरहें प्रकृति रुक्ष होय मधुवीण;
परिपूर्ण करा मज चिरपरिचित त्या सुरसें
हळुहळू पूर्ववत् वाटे मी होअीन."

८९अ धर धीर, असे हा अुदास मास विनाशी,
बालेन्दु करीलच मग भरपाअी खाशी;
बघ वयस्क विधु अुपवासें आणि जरेनें
कृश नम्र फिकट तो जाय झिजुन आकाशीं.

९० अेकेक यापरी वदती तोंच समोर.
वृक्षपथीं प्रतीक्षित नवेन्दुची ये कोर;
अन् ङिवचित म्हणती, "भाअी बघ करकरतो
मधुवाहस्कन्धीं मधुचा हारा थोर!"

* * *

९१ ओसरतां जीवन करवा मज मधु-पान,
निष्प्राण तनूला घाला मधुने स्नान,
कफनास पान घ्या त्या अमृतवल्लीचे
दफनास बाग-कड जें सङ्केतस्थान.

९१अ चैत्राचा होय न ताप अशा ज्या ठायीं
देतात सुहृद सुहृदास भेट सुखदायी,
अन् फान्दीखाली भिन्तीवरुन लवे जी
वर्षाया पुष्पें खाली शीर्षीं पायीं.

९२ मृत्तिकेंतुनहि मम मग मधु-गन्धोच्छ्वास
वर हवेंत सुटुनी होअिल मोहन-पाश
अन् जातां तिथुनी कुणि कर्मठ धर्मात्मा
तो करिल अचानक पकडुन धुन्द तयास.

९३ ज्या मूर्तीवर अनुरक्त जीव हा झाला
त्यांनीच घातला प्रतिष्ठेवरी घाला,
बुडविला यशोनिधि पहा अुथळ प्यालयांत
फुङ्कून टाकिली कीर्ति फुकट गाण्याला.

९४ कितिकदा खरोखर सुधारणेची आण
मी घेअिं, परि तदा होतें का मज भान ?—
ये तोंच गुलाबासह मागून वसन्त
अन् वैराग्याचे फाडी वस्त्र पुराण.

९५ जरि पाखण्डानें मदिरा दिसे नटे ही
सन्मानवस्त्र अन् जरी हिरावुन नेअी
तरि नकळे, घेती कलाल मधु विकुनी जे
असते का त्याची किम्मत अर्ध्यानेही

९६ हा ! गुलाबासवे व्हावा लुप्त वसन्त,
अन् समाप्त हा मधुगन्धियौवनगन्ध !
अन् न कळे विटपीं गाअी जो बुल्बुल तो
ये कुठून जाअी कुठे अुडुन तो हन्त !

९७ या रणांत जर का होता जीवन-भास
—जरि असला अन्धुक तयाचाच तरि खास—
तर शेतांतिल तुडविल्या तृणापरि मिळती
गति नवी खरोखर पहा श्रान्त पान्थास !

९८ द्रुत थाम्बवितां जर देवदूत या काळीं
ही अुलगडणें विधिलिखिताची गुण्डाळी
अन् म्हणता निष्ठुर लेखकास, "हें पूस,
वा यांत नोन्द कर तू अगदीच निराळी !—"

९८अ पण त्या व्यक्तीला, दुर्दैवें जी चूर,
करणेंच बरें भवपटावरूनी दूर,
परि काळ लोटतां करी अधिक कल्लोळ
तो नको वाढणें थेम्बें थेम्बें पूर !

९९ प्रियतमे, तो नि तू आणिक मी स्वाधीन
करु शकलों अवघी सृष्टियोजना हीन

तर करुन चुराडा विश्वाचा नाही का
करणार तयाची घटना हृद्य नवीन

* * *

१०० हा चन्द्र नवोदित ये तुज मज भेटाया,
लागेल कितिकदा वृद्धि-क्षय शशिला या,
यापुढे कितिकदा अुगवुन या अुद्यानीं
हुडकील आपणां——पण अेकाला वाया !

१०१ जअि रसिक खगगणीं शशिसुन्दर मधुराणी !
येऊन शाद्वलाम्बरीं गौर पायांनी
निज मधुक्रमीं तू बघशिल मत्स्थल शून्य
तअि तर्पणार्थ कर चषक रिता त्या स्थानीं !

# इतर कविता

## २. सामुदायिक प्रार्थना

१ झाले, आहे, व्हायचें अन् पुढे जें
त्या सर्वांचा जो नियन्ता अनादि,
अुच्चानन्दप्राप्ति ज्याच्या कृपेनें
त्या ब्रह्माला आमुचा हा प्रणाम.
"ॐ यो भूतंच०"—अथर्व. सं. १०।८।१.

२ आम्हांस जो देअुनी जन्म पाळी
जाणे विधी जो भुवनास सर्व,
जो अेक घेअी बहु देव नामें
पृच्छा तयाची करि भूतजात.
"यो नः विना जनिता०" ऋ. सं. १०।८२।३.

३ अनन्य अैशा परमात्मयाला
सम्बोधिती लोक बहु प्रकारें—
हा अिन्द्र वा हा वरुणाग्निमित्र,
वा वेगवान् दिव्य असा गरुत्मान्
—आदित्य जो घे रस शोषुनी तो—
हा अेक यालाच परन्तु देती
ज्ञाते असे लोक अनेक नावें
नानापरी वायु यमाग्नि अैशीं.
"अिन्द्रं मित्रं वरुण०" ऋ. सं. १।१६४।४६.

४ कानीं पडो मङ्गल आमुच्या सदा
दृष्टीं पडो मङ्गल आमुच्या सदा,

स्थैर्यें तुम्हांला स्तवण्यांत देव हो,
हें आयु जावें तुमच्या प्रसादनीं.
"भद्रं कर्णेभिः०"—वाज. सं. २५।२१.

५ सर्वेश्वरा तूजविना न कोणी
राही दुजा व्यापुनि वस्तुजात;
हव्यार्पणींच्या पुरवूनि अिच्छा
व्हावेंच आम्ही प्रभु सम्पदांचे.
"प्रजापते न त्वदे०"—ऋ. सं. १०।१२१।१०.

६ जो निर्मिला नत्र सतेज देवें
तो भानु येअी वरती चढून,
शताब्द आम्हीं रवि हा पहावा,
शताब्द आम्हीं जगतीं जगावें,

शताब्द आनन्द करीत आम्हीं
शताब्द मोदांत असे रहावें,
होअूनि लोकांत शतायु आम्हीं
शताब्द शब्द श्रवणीं श्रवावे,

शताब्द भाषा करुनी प्रकर्षे
शताब्द व्हावें जगतीं अजिङ्क्य;
तेजस्वि आयू अमुचें असे हें
अन्तीं विरावें परमात्मबोधीं.
"तच्चक्षुर्देवहितं०"—तै० आर० ४।४२।५.

७ जो देव नामें सविता तयाचें
तें तेज आम्ही स्पृहणीय ध्यावें,
बुद्धीस नानाविध आमुच्या की
देअील तत्काळ सुचालना तो.
"तत्सवितुर्वरेण्यं०"—चतुर्ष्वपि वेदेषु.

८ नित्याकडे ने मज नश्वरांतुनी,
ज्ञानाकडे ने मज अज्ञतेंतुनी,
रे मृत्युपासून करूनिया दुरी
प्रभो, मला पोचव अमृताकडे.
"असतो मा०"—बृहदार० १।३।२८.

९ अेकत्र या, अेकमुखींच बोला,
चित्तीं तुम्ही अेक विचार ठेवा,
पूर्वी जसा तो हवि घेत देव
साधा तसे अिच्छित अैकमत्यें.
"सङ्गच्छध्वं०"

१० सर्वत्रांची प्रार्थना अेक व्हावी,
सर्वत्रांचा सङ्घही अेक व्हावा,
सर्वत्रांचे होअूं द्या अेकचित्त,
सर्वांसाठी मन्त्र मी अेक गातों
सर्वांसाठीं समतेनेच देतों
अीशालागी हवि मी अेक आता.
"समानो मन्त्रः०"

११ व्हावी अिच्छा सकलांचीच अेक,
सर्वत्रांचीं हृदयें अेक व्हावीं,
सर्वत्रांचें मन तें अेक होवो
ज्यायोगें सङ्घटना, श्रीहि लाभे.
"समानी व आकूतिः०"—ऋ. सं. १०।१९१।२।४.

# ३. देव्हारे

[ओंवी, छन्द देवद्वार]

१ तेहतीस कोटी, देव या देशांत
भक्त का अनाथ, दीनवाणी ?

२ स्थळोस्थळीं येथें, असूनी देउळें
मानवांचीं कुळें, निराश्रित ?

३ देवांचे शृङ्गार, होती अन्नकोट;
कष्टाळूंचें पोट, न भरावें ?

४ रत्नसोनियांचे, देवावरी भार,
नागवावे पार, कष्टकरी ?

५ देवच न राहे, पतितपावन,
अुद्धार कवण, करणार ?

६ देवांना भङ्गती होती ते समर्थ,
दीनतेची शर्थ, भगतांच्या.

७ देवांवरी भार, कासया टाकावा ?
स्वतःच आखावा मार्ग आता.

८ नको देव ! व्हा हो, नर नारायण
राष्ट्रपरायण, करणीनें.

—२४ अेप्रिल, १९३५.

# ४. दुबळ्यांचा संव्सार

[ जाति दोहा ]

अेक कोम्बडी आणि तिचीं पिलें मिळुनि रस्त्यांत्
खेळत कण वा कीटक तीं टिपूनि होतीं खात्.
गोण्डस कोमल तीं बछडीं मध्ये आओी प्रौढ्—
कवण पित्याच्या दृष्टिस तें दृश्य न लाविल ओढ् ?
तोंच काय कलकलाट हा, फडफडाट हा ? हाय् !
झडप अचानक घालूनी शुभ्र काहितरि जाय्.
विसलीं गळलीं वाटेने पिसें सान दो तीन्,
चाले घाबरलेल्यांचा कलकलाट तो वीन्.
स्तिमितपणें अिकडे तिकडे बघतां बोले अेक्
'नेले कालहि बोक्याने बच्चे धरुनि सुरेख्.'
अुद्या कुणावर पडायची अता झडप ती क्रूर्
करित काळजी याची मी गेलों थोडा दूर्.
परतुनि येतांना दिसला शमलेला आक्रान्त्,
करुनि घोळका खेळत तीं टिपूनि होतीं खात्.
गेलें तें गेलें बच्चें ! जाणवेच न अुणीव्;
कणकीटक टिपणें बघुनी सखेद ये मज कीव्
असा असावध दुबळ्यांचा चालणार संव्सार्—
अदृष्ट न सवकेल कसें ? कोण करिल अुद्धार् ?

—२१ नोवेम्बर, १९३४.

## ५. रक्षिल कोण निदानीं आअी ?

[जाति लवङ्गलता]

जो तो सुत सोडुनि तुज जाअी
रक्षिल कोण निदानीं आअी ? ध्रु०

१ नअू मास तू भार वाहिला यांचा अपुल्या पोटीं,
यांच्या माथां लादूं बघशी भार म्हणुनि का बाअी ?

२ हृदयींच्या रक्ताचें पाणी पाजुनि वाढविलें तू,
ठेविशि का मग हृदय अुपाशी ? का ही आग न दाही ?

३ वृक्षलता का व्यवहाराच्या साठी फुलती फळती ?
अुपकाराचा व्यापारच करुं जातां काय भलाअी ?

४ कोण्डूनी पञ्जरीं विहग का स्वस्थ सुखें राहिल तो ?
भुर्र अुडुनि जायचीं पाखरे, मुले तशींच पहा हीं.

५ पृथ्वीचा सुत चन्द्र कशाने फिरतो तिचिया भवती ?
स्वातन्त्र्यामधि का प्रेमाचें गूढाकर्षण नाही ?

६ केळफण्यांची वाढ यथास्थित खुल्या प्रकाशीं होवो,
म्हणुनिच गळती पारी काढुनि निज छत्रांची साअी.

७ जलबिन्दूंना नभीं रविकरासवे जाअुं दे भूमी
कठिण समय येतांच धावुनी शान्तविती लवलाही

८ मोकळीक दे आअी, यांना आशीर्वादासङ्गें,
ठेवितील हे सुपर्ण अमृतकुम्भ तुझिया पायीं.

—२ फेब्रुवारी, १९३५.

# ६. दुबळ्यांचा न्याय

[जाति पञ्चकल्याणी]

१ होओी खेड्यांतुनि बोभाटा,
सर्जेराव मारितो वाटा,
बन्दूक बाळगी, काडतुसांचा साठा.

२ कोणी वेरड हा न अडाणी
याचा वेष फाकड्यावाणी.
तोण्डावर खेळे किती शहरचें पाणी.

३ त्याला भीत सर्वही कांकी
पटका, कोट, चोळणा खाकी,
अैटीने नियमितपणें पाअुले टाकी.

४ लागे कुणी न त्या साङ्गाती
जाअुनि तडक गुन्हाळें गाठी
पैक्याच्या साठी करी कडक दमदाटी

५ भरती हाट न आठवड्याचे
बसती बैल घरीं छकड्याचे
दुर्दैव सदाचें या कष्टाळु गड्यांचें!

६ वार्ता जाय मुख्य नगराला,
चर्चाविषय नवीन जहाला,
स्वस्थताच अजुनी, की पेठेंत न घाला.

७ चाले राअुळांत जयघोष
पोचे आंत न तो आक्रोश
जरि शेतकऱ्यांच्या पडे घशाला शोष.

८ अमुचे निःशस्त्रांचे राजे
यांचें वैभव काय विराजे!
आसेतुहिमाचल यांचा महिमा गाजे.

९ म्हणती शेषशायि भगवन्त
न करी कलिकलहाची खन्त,
जो दुर्बल जन विश्वसे तयाचा अन्त!

१० येतां दुष्ट लहर माजाची
सर्जेराव सतींना जाची;
अबलाच कामनापूर्ति जगीं प्रबलांची!

११ घेतां लज्जा अशि लक्ष्मींची
दीनहि कुठवर करितिल चीची?
नररक्त उसळते, अैकवे न ती छीछी!

१२ मारूं अथवा मरुनी जाअूं,
आला तोहि कुठून लढाअू?
ही धार विळयाची बन्दुकीस त्या दावूं.

१३ पडला अेक गडी घायाळ,
अुठला तोच दूसरा काळ.
घालुनी पेच मोडिला हात तत्काळ.

१४ आत हाड हाड मोडा रे!
मागुनी जिवानिशी सोडा रे,
अन् खेड्यापाड्यांतुनी यास ओढा रे.

१५ परि ही चीड ओसरुनि जातां
होतिल ज्ञणि मेण्ढ्यापरि आता
सोसाया पुनरपि कष्टुनि नमवुनि माथा.

—७ मार्च, १९३५.

---

## ७. फटकळ अभङ्ग

[छन्द देवद्वार]

१

चालला असेल आज नामघोष—काय कण्ठशोष देवासाठी !
माणूसपुराचा राउळाला वेढा, विठ्ठलाचा वेडा भक्तगण.
चन्द्रभागेकाठी वालुकेचे कण, त्यांहूनहि जन उदण्ड ते.
विठ्ठल विठ्ठल ! तुम्बळ गजर, कोन्दलें अम्बर टाहोने त्या.
चौदा चौकड्यांचें राज्य मूल्यहीन, देवपदीं लीन भागवत.
प्राण गेला जावो देवाचिये द्वारीं, मोक्षाची पायरी भेटली ना ?
कासया हें जिणें ? दे गा देवा, मुक्ति; काहीतरी युक्ति कर राया,
विटेवर पाय कटीवर हात, तटस्थ पहात उभा का तू ?

२

तुझ्या माहात्म्याचा आषाढीचा दिन, तथापि वन्हीन दुरून मी.
या लोकासारखा कसा घेऊं धाव ? मोक्षाची त्या हाव नाही मला.
कशी मागू देवा ! कैवल्याची भीक, हवी मोकळीक प्रपञ्चाची.
माझ्या एकट्याचा कशाला उद्धार ? राहिला संसार करोडांचा.
फार झाला देवा स्वार्थाचा सङ्कोच, आता तो नकोच परमार्थ.
प्रपञ्चीं मङ्गल सावधान नीट राहूं द्या, का झीट भक्तीची ती ?
अफूच्या गुङ्गींत विस्मृतीचें सुख, तयाचें कौतुक मी न करीं,
तू पण साम्भाळ, वेड्यांची या सेवा विपरीत देवा फळायची.

३

तुझे भक्तगण तुझें देवपण घेती हिरावून पाण्डुरङ्गा.
तुला स्वतापरी मानूनि साचार, सारे सोपस्कार करिती ते.
चुकूनि ये तुझें नाम जिव्हेवर, पापाचे डोङ्गर भस्म होती.
तुझ्या नामाचा हा विचित्र महिमा, केवी न्यायसीमा ओलाण्डी रे ?

जनांत जाणूनि स्तुतीचा प्रभाव, देवाचा ते भाव ठरविती.
दागिन्यांनी तुझें करिती कौतुक, की शृङ्गारसुख जाणती ते.
मोकळे कराया वाटेल तो छन्द, तुझें तोण्ड बन्द नैवेद्याने.
अशा भगतांचा होशी देवा राणा—आहेस शहाणा, काय साङ्गू ?

४

कटीवर हात ठेवूनि तिष्ठत, पुढे काय गत पाण्डुरङ्गा ?
भक्तांनी घातले तुला हे दागिने, पराक्रमाविणें टिकती न.
आपुलिया बळें राही न सदाचें, तुझें पाषाणाचे राअूळही.
रहाया अभङ्ग सुन्दर हे ध्यान, हवें अधिष्ठान कशाचें रे ?
रक्षितील काय दुबळे भगत ? सोमनाथ-गत नाठवे का ?
भक्त आटपतां तूच जगतात, होशील अनाथ जगन्नाथा !
अिहलोकीं कर भक्तांना समर्थ, आज काय अर्थ परलोकीं ?
टाक योगनिद्रा, अैक शब्द माझा, पण्ढरीच्या राजा विठ्ठला रे !

५

पुरे झाली देवा, आजवर शोभा, मार आता तोबा भक्तांना या.
युगें अठ्ठावीस परवश जिणें, जणूं मिरवणें प्रेतयात्रा.
कोणीही कोठून यावें झोडपावें, त्यांस निष्ठाभावें सेवितोच !
अेकमेकांवर खातों दातओठ, भरितों हे पोट अुच्छिष्टाने.
सहस्रवर्षांचें साचलें हे काळें, त्यानेच सावळें तुझें रूप.
तुझ्या समाजाची हीच का धारणा ? देवा, विचारणा करितों मी.
काहीच का नाही दैन्याची या लाज ? पुरे योगिराज काळझोप !
जेणे हेलावेल चैतन्यसागर, असें काही कर तातडीने.

६

अनायासें लाखों भक्त भोळसट, झाले अेकवट तुझे दारीं.
त्यांना पटवूनी देअी कटु सत्य, तुलाच अगत्य माझ्याहून.
आपुलालें पोट सारें टीचभर, त्यांत विश्वम्भर नाही नाही.
अमलेच्या कामीं नियळूं द्या धर्म, हेंच धर्मकर्म नीट जाणा.

विठोबा रख्माओी पहा कोटयवधी, महाराष्ट्रामधी त्यांना भजा.
त्यांचिया सेवेने प्रसन्न तो होओी, प्रत्येकांत राही जो देव तो.
सहकारयत्नीं भत्यांचें सामर्थ्य, हे न जाणा मर्त्य—अमर हें.
क्षितिजा भिडवा कर्तृत्वाची सीमा पण्ढरी-महिमा त्यांत आला !

—१२ जुलै, १९३५.

---

## ८. अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळास

[जाति दोहा]

भरे मसीच्या रङ्गाने　　अफाट वर आभाळ्,
दिसति पसरले दूरवरी　　हिरवळलेले माळ्.

तृप्त दिसे ही वसुन्धरा　　पाणी पडुनि अुमाप्,
कडकडणारी वीजहि ती　　निवली आपोआप्.

घेतां पाअुस त्यांतूनी　　थोडी अिष्ट अुसन्त्
अडकुन राहिल कोण घरीं　　करित बसाया खन्त् ?

मुक्त मनाने मी पडलों　　फिरावया बाहेर्,
खुलें प्रदर्शन पाचूचे　　पहावया चौफेर्.

तों आर्तस्वर ये कानीं,　　ओळखिचा तो बोल्
गूढ विसङ्गति जाणवुनी　　ड्हुळे हृदयीं खोल्.

राअींतुनि तोच स्वर ये,　　होअी शङ्का दूर्,
वसन्तदूताचाचि निघे　　शब्द फोडुनी अूर्.

हाच शब्द अैकुनि मागे　　चमकुनि ववले लोक्
रङ्गित ऋतु अनुरागाचा　　आला सोडा शोक्.

तोच स्वर दे काय कुणा　　नवलाचा आल्हाद् ?
भलत्या वेळीं कोण अता　　करीलही संवाद् ?

बाळपणींच्या मित्रा रे,　　ओळखिची ही हाक्
अुधळुनि दे हृदयामधली　　गत आशांची राख्.

प्रियजन ते जवळ न आले　　अैकुनि हृत्स्वर हाय् !
असह्य गजबजल्या जगतीं　　जिणें असे असहाय् !

गेला गेला वसन्त तो,　　ये पळसाला पान्,
तीव्र मूढ हट्टाने तू　　करिशि कुणा आव्हान् ?

आरक्त न रानीं कोठें विसावयाचा रङ्ग्,
असशी तू अपुल्या कवण स्वप्नामाजी दङ्ग् ?
फेक फेक सहकारीं त्या दृष्टि अुपाशी फेक्—
सरस मञ्जरी मोहक ती चुकुनिहि नुरली अेक्,
तरुण मनानें असुनि गड्या काय अता अुपयोग् ?
नव बाल्यें नटल्या जगता कळेल का हृद्रोग् ?
अजुनिहि नाही का शमली तव वासन्तिक भूक् ?
लावी का चटका अजुनी तूज अमूक तमूक् ?
वसन्त गेला रे गेला ! व्यर्थ प्रेम अगाध् !
मूठ झाकली अुघडुं नको मौनें लौकिक साध्.
मुलेंहि वेडावीत अता देतील न पडसाद्,
टळल्यावरती काळ तुझी घ्यावी कोणी दाद् ?
पर्णकुटीमधि अपुल्या रहा मूक अज्ञात्
शब्द अवेळीचा करितो अपकीर्तिच जगतांत्.
कीव कुणाची नको, नको सहानुभूति अुधार् !
स्वराचेच जन हे भोक्ते शब्दानेंच अुदार्.
वसन्त गेला रे गेला ! होअी परि न निराश्,
धीर धरी यापुरता की होय न सर्व विनाश्.
सहासात मासांचा हा सोस अल्प वनवास्,
कुणा सुभद्रेसाठी की त्रिदण्डि हा संन्यास्.
वसन्त येतां क्षणीं पुन्हा ती भेटेलच तूज्
करावयाला हृदयींची गूढ मधुर कुजबूज्.
न जीवितीं परि मनुजाच्या पुनरपि येअि वसन्त्—
जर न सदाची खन्त् ?
काय करावें रे त्यानें

—१५ जुलै, १९३५.

# ९. बाळाचें आजोळीं जाणें

[ छन्द वैकुण्ठ ]

आगगाडीने हे सोने आजोळी जायचे
बाळावीण माझें घर सुनेच व्हायचे.

हुरळून पाउस हे घरात बागडे
कैसे कळावें त्या माझ्या जीवीचें साकडें ?

झोपायला घेऔं त्याला मी माझ्याजवळीं,
न कळे त्या झोपेमध्ये कोण का कवळी ?

जाऔ तेथे मायेचाच घास हा खाऔल,
उगीच हे मायमन चिन्तेंत राहील.

पुरणाची पोळी माझ्या बाळाला रुचते,
आज भपभप गाडीपुढे न सुचते.

घेतला मी जेवायला माझिया ताटांत
कालविला अदमुन्या दह्यांत मी भात.

अुठे बाळ दोन घास घाऔने जेवून
म्हणे सारजाऔला 'जा टाङगा ये घेऔन.'

न कळे त्या सारजाऔ का गप्प अुदास,
याचा अधीर आनन्द चालला अुतास.

चिमुकल्या पेटीमध्ये ठेवीले कपडे
बाळपोथी पाटी यांचा विसर न पडे

शिली सङगें चेण्डूफळी आणखी पिपाणी,
चिमुकला संसार तो ठेविला ठिकाणीं.

बाळ टाङग्यांत बसतां आनन्दें बावरे
खाली सारजाऔ उभी हुन्दका नावरे.

बाळापुढे आगगाडी आणखी अिञ्जीन,
धक्क्यावर आवरणें त्याला तें कठीण.

भपभप गाडींतून जाण्याचा आनन्द,
करी प्रश्न, झालें आआी अिञ्जीन का बन्द ?

दोन्ही गालीं दोन पापे घेआी तो सुस्पष्ट.
कळावेत त्याला केवी जीवाचे या कष्ट ?

हासरें तें मुख पाही मी डोळे भरून—
अमङ्गल अश्रूंना मी न देआीं झरून.

घण्टा झाली, शीट झाली डबाही हालला,
ठेवा माझिया मायेचा दूरच चालला !

कोठवर नावाने हा गम्मत पाहील ?
घडिभरामध्ये गाढ झोपून जाआील !

तशी झोप कोठुनि हो मजला लागेल ?
देह विसावला तरी जीव हा जागेल.

—२७ ऑगस्ट, १९३५.

---

## १०. चित्रांचा रङ्गविलास

[ जाति अचलगति ]

चित्रांचा हा सायङ्काळ्,
चित्रविचित्र पहा आभाळ्.
रौप्य गिरीचा नभीं प्रसार्,
खोरें वृक्षश्यामल फार्.
क्षितिजीं कोठे दिसतो दूर्
अुलटा जणू ओघळतो धूर्.
नभोगिरीला तोण्ड पडून्
कुठे रुपेरी वरसे अून्.
चैतन्य पहा हें अनिवार्
तळपे हिरवें गार शिवार्.
घेतीं कणसें तेज पिअून्.
व्हाया पिवळीं सोन्याहून्.
कारळिच्या पुष्पांत सवङ्ग्
होअी सोन्याचा हा रङ्ग्.
निम्नोन्नत हा कृष्णाकाठ्
शरदृतूचा दावी थाट्.
मेघांचे हे अुज्ज्वल रङ्ग्
बघुनि गिरीसहि सुचती ढङ्ग्.
मेघांच्या पडछाया वेळ्
गिरिदेहीं पडतात सुरेख्.
डोङ्गर करडे वृक्षविहीन्
डोङ्गर नील नभांत विलीन्.

पालटती सरड्यापरि रङ्ग्,
पाहुनि होओी मानस दङ्ग्.
अस्तगिरीच्या भवती गोल्
अुडती रङ्गाचे कल्लोल्—
निळे, जाम्भळे, काळे रङ्ग्,
राखी, ताम्बुस, पीत, पिशङ्ग्;
रुपें कुठें कोठें भिङ्गार्
भूवर पाचू हिरवी गार्.
सृष्टि रवीसह खेळे रङ्ग्
क्षणभरि सङ्गामधि निस्सङ्ग् !
जाय रङ्गुनी रवि अस्तास्
रङ्गें भरुनी भू-आकाश्.
रङ्ग लुटा या रानोमाळ्
चित्रांचा हा सायङ्काळ्.

—२२ ऑक्टोबर, १९३५.

---

## ११. मूक झुरणी

[ गज्जल वृत्त ]

दूर तुझ्यावीण मूक जीव झुरे अेकला,
राहुं तया दे क्षणैक वक्षि तुझ्या टेकला.

स्पर्शुनिया तूज धन्य मञ्जुळ नादामधे
नूपुर पायीं सशब्द आणि कटी मेखला.

देवि, तुझा दे प्रसाद गीत तुझें गावया,
का करिशी गे कठोर वृत्ति तुझी प्रेमला ?

त्या नयनांतूनि फेक आद्यरसाची द्युती,
जोडुनि का शुष्क शब्द अुच्छ्वसुनी ये कला ?

थिल्लर हा व्यर्थ शब्द, मूकपणें हार तो
गाढ अुरीं स्पन्दमान, वास हवा तेथला.

—२१ दिसेम्बर, १९३५.

# १२. देवाची समाधि

[ छन्द देवद्वार, अभङ्ग ]

१

विटेवर अुभा अठ्ठावीस युगें, होअी तें तें बघे पाण्डुरङ्ग.
जाणून नेणता नाना पूजाभोगीं, राहे ज्ञानयोगीं अुदासीन.
डोळ्याचें पातेंही याच्या नच लवे, कोठून कालवे मग पोटीं
जात्यांत घालूनी भरडो अविन्ध, आनन्दी आनन्द निर्वाणींचा !
ब्रह्मानन्दीं अशी लागलिया टाळी, देहार्ते साम्भाळी कोण बरें ?
भक्त-योगक्षेम मग कोण पाहे ? हात कटीला हे चिकटले.
सोडिलें त्रैलोक्यराज्यसत्तालोभा, केली दिव्यशोभा आपुलीच.
ज्ञानराजावीण कोण अशी साधी, जिवन्त समाधि चिरन्तन ?

२

पाण्डुरङ्गा, आता कळलें मनास, स्वपदसंन्यास का घेतला ?
विश्वशासनाचे चालती दण्डक, व्यक्तीची का मग लुडबूड ?
अुन्नतीचा मार्ग न कुणाला बन्द, घ्यावा लोकीं छन्द विचारून.
भवितव्यतेचा आपुल्याल्या जो तो, शिल्पकार होतो स्वकष्टाने.
नको तो प्रसाद, नको अुपकार, देवावरी भार आता नाही.
देव आणि काळ झाले असमर्थ, यत्नीं मात्र अर्थ आता अुरे.
लोकांच्या यत्नें लोकांची उन्नति, हीच कर्मगति न दुसरी.
तरा किंवा मरा विठ्ठलाला काय ? ज्याचा तो अुपाय का न करी ?

३

शिकविल्यावीण तुम्ही शिकवण, राष्ट्रास कवण पटली गा ?
जग आज म्हणे ज्याला धर्मलण्ड, तो करी प्रचण्ड धर्मकार्य.
भेद जन्मसिद्ध, भोग जन्मसिद्ध, हे सारे निषिद्ध झाले तेथे.
अळशी विलास गेला देशोधडी, नरभक्ति खडी काम करी.

अेकमेकासाठी धरिती सुपन्थ, बळ हें अनन्त स्वकष्टाचें.
न लगे प्रेषित, न लगे मन्दिर, घण्टांचा गजर कशाला तो!
देवखुळेपणा क्रूसींच लटके, भक्तीचे झटके आटपले.
प्रेषितच काय, प्रेषिताचा बाप, झाला आपोआप क्रूसारूढ.

४

क्रूसारोहणाची कोठून रे चिन्ता, तुला भगवन्ता अुपजावी?
प्रभूचे न होती सुळावरी हाल, अुत्क्रान्ति पहाल प्रभूची ही.
भगवन्ताच्याच ठायीं ठायीं मूर्ती, अवतारपूर्ती झाली तेथें.
सुखें हाणा मारा या मूर्ती अभङ्ग, सङ्गांत निस्सङ्ग सदा अुभ्या.
तुकोबा पाहता असें विश्वरूप, तर तो अमूप आनन्दता.
आपुलें मरण पाहतां तो डोळां, मानी तो सोहळा अलौकिक.
आपुलें मरण देवा, तूच डोळां, पाहतां सोहळा काय वानूं?
या रे सानथोर बघावया आधीं, जिवन्त समाधि अीश्वराची.

५

देवा तुझ्यावरी माझा भक्तिभाव, घेतसे अुठाव म्हणूनीच.
सम्राट् विश्वम्भर रङ्कांचा किङ्कर, संन्यासी शङ्कर स्मशानींचा.
न लगे बळाने आणावया ओठीं, राजनिष्ठा खोटी कशीतरी.
न ये अुपयोगीं येथे हांजी हांजी, कर्मवशा गाञ्जी ज्याची त्याला.
न तो अुपकार लाभल्यास फळ, श्रेय तें केवळ ज्याचें त्याचें.
असून नसल्या सारखा अीश्वर, ध्येयरूपधर स्फूर्तिदाता.
जेथें जातों तेथें तो माझा साङ्गाती, न धरीच हातीं, चाल म्हणे.
तो न पण्ढरींचा, तो न अम्बरींचा, धनी अन्तरींचा सर्वत्र तो.

—३० जून, १९३६.

---

## १३. पश्चिमेच्या मारुताचे अुच्छ्वास

[ वृत्त भ्रान्त ]

पश्चिमेच्या मारुताचे हे अुसासे अून का?
अून हे सेवूं नका.
का अुसासे टाकितों मी—सत्य घ्या हें अैकुनी—
येअि मी जें देखुनी.
तो पहा दूर प्रतीची, डोम्ब आगीचा पहा,
होय त्याचा ताप हा.
आर्द्र अङ्गीं सागराच्या लोळुनी आलों तरी
आग होअी अन्तरीं.
पावलों अुत्तुङ्ग या सह्याद्रिच्या शृङ्गावरी
दाह जीवाचा परी.
धूर जो तेथील माझ्या काळजाला झोम्बला
घेरि आणी तो मला.
जाअिना डोळ्यांपुढूनी दृश्य जें मी पाहिलें
जाअिना तें साहिले!
ने कसे कासार-काठीं शान्तिपाठी पण्डिती
मञ्जुनादें मण्डिती.
आणि त्यांची गोड पुङ्गी दुर्बलांना गुङ्गवी,
स्वत्व त्यांचे लुङ्गवी.
जाणती नेणीव साधूंची न साधे ती मला,
जीव हा वैतागला.
कृष्ण राष्ट्राच्या अितिश्रीची घडी ही पातली,
विश्वबुभुक्षा मातली.
धाड घाली लाण्डगी साम्राज्यलोभें झिङ्गली
श्यामलांच्या जङ्गलीं.

स्वीय उच्छ्वासासवे दे सोडुनी नाना विषें
　　मुक्तिदानाच्या मिषें.
अन्तराळातून झेपा घालुनी घारीपरी
　　वृष्टि अग्नीची करी.
चाकलें भाजून खावें मांस साङगे संस्कृती
　　गौरवर्णे चारु ती.
संस्कृतीची याच शिक्षा श्यामलांना द्यावया
　　पातली देखा बया.
हीं द्विपाद प्राणधारी जङ्गली का माणसें ?
　　मेन्दु हा त्यांना नसे.
बाहुचें सामर्थ्य आहे, कोट छातीचा खडा,
　　होय जीवाचा धडा.
फोल हें यन्त्रापुढे; बुद्धिप्रतापाच्या पुढे
　　क्षात्र आता बापुडें.
हे हटे, झुञ्जे हटानें, घाव घे छातीवरी,
　　साह्य कोठे ओीश्वरी ?
फोल आता न्यायनीतीच्या जुन्या त्या कल्पना,
　　धर्मभोळ्या जल्पना,
धर्मबन्धुत्वाचिया डोक्यावरी ही पाय दे
　　माजली सत्तामदें.
युद्ध धर्माशीच चाले, धर्मयुद्धीं या नव
　　दीन तो जो मानव
हिंस्र शस्त्रास्त्रें नवीं जो निर्मुनी नानापरी
　　दुर्बलांना संहरी,
आपुल्या देवापरी जो दुर्बलांचा घातकी
　　तो कशाचा पातकी ?
हा निमित्ताचा धनी योगेश्वराचा हा सखा
　　बोध या पार्थास का ?

दुर्बलत्वालाच मानी पाप तो जिङ्की जगा
सत्य सैतानी बघा.
दोष आता आपुल्या ह्या रानटी नीतीप्रती
जीर्ण होअी क्षिप्र ती.
बायका पोरें रडूं द्या, त्यास रक्षा जोहरीं,
अन् रणींचीं मोहरीं
घेअुनी गाडूनि खेतीं, झुंञ्जुं द्या हारींत ही
राजपूती रीत ही !
सर्व नाशाच्या प्रसङ्गीं स्वत्व अर्धे सोडिना
शत्रुमैत्री जोडिना,
त्या नृसिंहाला शहाणे निन्दिती, निन्दोत ते
भानु तो, खद्योत ते !
टेकला अस्ताचलीं तो तापल्या सोन्यापरी
स्वप्रभा दावी खरी.
वानूं द्या चङ्गीझतैमूरादि जेत्यांना कुणी
दास अर्थाचे गुणी;
या पराभूतापुढे झुञ्जार माझी मान मी
वाकवूनी त्या नमीं.
श्यामलाच्या हे नरेन्द्रा, तूज साठी आसवें
अुष्ण अुच्छ्वासांसवे.
मीहि जातों संस्कृतीच्या पार कैवल्याश्रमीं—
का भ्रमूं येथे श्रमी ?
खड्ग त्या दुर्धर्ष गौरीशङ्कराच्या सङ्गती-
वीण कोठे सद्‌गती ?

—४ मे, १९३६.

---

# १४. दुक्खान्तीं दुक्ख

[ जाति दोहा ]

नव नव जीवन जननीच्या प्राणान्तिक दुक्खांत्,
हाय ! काय या सत्याचा होओी वज्राघात् !
आओी किंवा बाळ अता घ्या दोहोंतुनि अेक्,
आनन्दाचे शोकाचे करा मिश्र अभिषेक्.
मग लोकोत्तर हृदयाचा शस्त्रकुशल तो हात्
गुप्तपणें निज कार्य करी, सापडे न मोहांत्.
प्रसङ्ग तो अजुनीहि कसा डोळ्यांपुढुनि न जाय्
जन्मा आधिच बाळ रिघे निर्वाणाप्रति हाय् !
अनघ अर्भका रे माझ्या, हा का रे तुज ताप् ?
मरणांतहि किति सुन्दर तू शान्त मधुर निष्पाप् !
गौर किती तव कान्ति किती तनु गोण्डस सुकुमार् !
स्पर्श करावा सुमनांनी मात्र जया हळुवार्.
भीति आणि आशा यांच्या द्वन्द्वामधुनी तूज्
वाढविलें ना रे कथुनी जीवींचें हितगूज् ?
रक्त देअुनी हृदयींचें केला तर साम्भाळ्
अशा प्रसङ्गासाठी का ? कठिण कठिण हा काळ् !
जपली जपली जी तुज ती ही येथे निस्त्राण्
प्राणहि देती तुजसाठी मातृत्वाची आण् !
सत्कारास्तव जमलेलीं वस्त्रें हीं अनुरूप्
दुपटीं गलुतीं झबलीं हीं भिअून झालीं चूप्
हौसेचे घालुनि टाके शिवी यांजला माय्—
मृण्मयवस्त्रीं परि होता पडायचा तव काय् !

घरीं परततां जडहृदयें ये बाळांची साद्
ज्यांच्या तोण्डावर खेळे आतुर कुतुकाल्हाद्.
'बाळ कधी येंअिल साङ्गा' अैसा घेती ध्यास्,
काय साङ्गु समजावुनि मी या चिमण्या जीवांस् ?
"बाळ घरीं येंअीना रे जरि म्हटलें मी 'थाम्ब'—
गेलें देवाच्याच घरीं, तें घर भारी लाम्ब."
'आम्ही खेळू कोणाशी ? ' 'मजशी साञ्ज सकाळ्—'
'तुम्ही मोठे आहां हो ! लहान आणा बाळ्'
बाळांची या कशीतरी होअीलच समजूत्—
काय करावें थोरांनी जरी कळे सब झूट् ?
आवरूनि हें पुनःपुन्हा घेतों मनें निरोप् !
शान्तपणानें अता तरी काळ-झोप जा झोप्.
अुठुनी येंशिल भेटाया तेव्हा न करीं चूक्—
दुक्खान्तीं हे दुक्ख पुरे ! दे दुक्खान्तीं सूख् !

—२९ जून, १९३६

---

## १५. माझी सानुली



पोर ही सानुली
की सोन्याची बाहुली
देव हिच्यावर ठेवो मायेची साअुली. १

सुन्दर हसते,
नि मोहक रुसते,
ठेपराअीने ही कशी चालते बसते! २

बोबडें बोलते
नि हृदय खोलते
मन माझें बोबड्या या बोलांनी डोलते. ३

साधेच कपडे
ही घालुनी बागडे,
गौरीहून ज्याला त्याला कशी ही आवडे. ४

या हो या पाहुणे
या नवे या, या जुने,
भण्डाऱ्याचा प्रसाद घ्या, काहीही न अुणें ५

—२२ ऑगस्ट, १९३६.



# १६. श्रावणांतलें अून

[जाति दयिता]

झाळा सुटली आणि जसें कारञ्जाचें पाणी
तशीं मुलें बाहिर पडलीं अुसळुनि गोजिरवाणीं.
मोकळिकीच्या मोदें ये म्लान मुखींहि तजेला,
हां हां म्हणतां दिवसाचा शीण मावळुनि गेला.

नभःपट जसा वरी दिसे अुडतां बलाकमाला
तशी दिसे रथ्या सगळी सुटतां बालक-शाला.
पायचाकिवर तों कुणि ये त्वरे वाजवित घण्टी
आवरे न ती आवरतां— प्राण आणि ये कण्ठीं!

पोर कुणी गवसून पुढे पडे धाडकन् खाली
पुस्तक पाटी आणि बहुधा विस्तरल्या भवताली.
धावुनि मी अुचलुनि घेतां पोर दिसे बेशुद्ध,
पायचाकिवाल्या भवती जमले दुसरे क्रुद्ध.

वैद्यघरीं अुपचारें ती शुद्धीवरती आली,
केवळ भीतीचा धक्का, नसे दुखापत झाली.
सोपवुनी मी तिला घरीं जवळच घर तें होतें,
परत फिरे मी तों अुठलें मम मनिं वावळ मोठें.

अशीच माझी कन्या ती, असेल ना सुखरूप!
नयनीं पाणी भरे तसा मनिं अन्धार गुडूप.
पोर पाहिली बागडती मी जंव घरिं येअून
लक्ख पसरलें तंव हृदयीं श्रावणांतलें अून.

—२५ नोवेम्बर, १९३६.

## १७. काय हो चमत्कार !

[ वृत्त मृदङ्ग ]

कोठून ये मधुसुगन्ध असा मनोहर
आम्रावरील झडला जर सर्व मोहर ?
आहेत ते धवळले कडुनिम्ब मोहरे,
येती फुलूनि सुरऔ मधुगन्ध तो बरें.
का ये शिरीष अजुनी मग पालवीस न ?
निष्पर्ण हा अजि दिसे किति दीन भीषण !
दावी परी पळस तो मधुरङ्ग केशरी
की प्रेमरङ्ग खुलवी न जया दिसे सरी.
या सान्ध्यवायु-लहरी गमतात शीतल,
स्पर्शूनि या निववितात अता महीतल;
या घालवूं न शकती हुरहूर दूर का ?
वाटे विलक्षण जिवास असें चुकूर का ?
'कूऊ' प्रबोधक मधुस्वर का न तो उठे?
आला वसन्त, कविकोकिल* हाय तो कुठे ?

—१९ मार्च, १९३७.

* 'आला वसन्त कविकोकिल हाहि आला' —चन्द्रशेखर.

# १८. साशीर्वाद निरोप

[ सुनीत ]

'ताता'! मारित हाक लाडिक अशी धावूनि आलास तू,
होतो वाचित मी चिडूनि म्हटले 'जा! देशि का त्रास तू?'

झालें खर्कन तोण्ड वाअिट तुझें, तत्काळ येअी रडें,
अन् वेगें फिरलास तू परतुनी जायास कोणीकडे—

तों पाठीवरती कडाडुनि बसे चाबूक तैशापरी
मी खुर्चीवरुनी त्वरेंच उठलों दुक्खावुनी अन्तरीं,

घेअी मी अुचलूनि अङ्ग तंव तों थोडें विसे तापलें,
जीवा चैन नसे तुझ्या म्हणुनि ना आलास 'ताताकले?' ..

आता तू असशी सुखी, विसरुनी गेलास तें मागलें,
मी मोठा, मजला न तें विसरवे, जीवास तें लागलें;

घ्यावी धाव तुवा अशी मजकडे अन् मी करावें दुरी?
—बाळा जाअुं नको दुरी भरभरे रे प्रेम माझे अुरीं!

जातां ख्यात करावया पण पुढे तू जा दुरी, खन्त न.
साशीर्वाद निरोप घे, करिन मी तूझें यशश्चिन्तन.

—६ जुलै, १९३७.

# १९. सिंहाचा पाडाव

[ सुनीत ]

'बचेगे तो औरभी लढेगे' —दत्ताजी शिन्दे.

नीचांना न रुचे मृगेन्द्र चळतां तो स्वीय सिंहासनीं,
'छे हा योग्य न धर्मराज'! म्हणुनी हो अेक कोल्हेकुअी,
अन् भोळे पशु काळजींत पडती, माजेल येणें वुही
नेता निष्ठुर धूर्त काय न लगे या शान्तियुद्धाङगणीं?
ह्याकाटी तुज पञ्जरीं पकडण्यासाठी अुठे काननीं—
ये कोणासहि पङ्क तो अुडवितां निष्पाप पङ्केरुहीं
सूर्याला न चुकेच सन्धि मिळतां ग्रासावया राहुही—
हें आश्चर्य न बन्धनीं पडुनि तू जम्बूक होतां धनी.

'झाली क्रान्ति,' म्हणे कुणी, 'प्रगति ही हिंसा न होतां मुळी!
होअी पाशव शौर्य पार लटिकें सत्य प्रयोगांत या!
प्रायश्चित्तच घ्या नखें अुतरुनी की हो स्वधर्मच्युती'—
तों माहात्म्य खरें तुझें अुसळुनी गर्जे, 'सुखें घ्या सुळीं!
नाही मी त्यजिला स्वधर्म, न कधी सोडीन जातां लया—
मारा शम्भुपरी, तुळापुर करा, आत्म्यास नाही मृती.'

—२८ जुलै, १९३८.

# २०. अेक चान्दणी रात्र



[सुनीत]

आहे शान्त निशा, टिपूर पडलें हें चान्दणें शीतल
आकाशांत निरभ्र चन्द्र विलसे सिंहासनीं की स्थिर;
व्याधावीण वुज्या पहा फिकटल्या स्वर्बालिका चञ्चल,
साधूंच्या जणुं की तपें अुभविलें वाटे नभोमन्दिर,

भासे हें परि खिन्न आणिक सुनें, या गुल्छबूंच्या परी
नाही अेकहि फूल आज, न कुठे सौगन्ध तो मादक,
वायूच्या लहरी सलील नकळे कोठे दडाल्या तरी,
शुभ्र व्यापक शीत हे मज मुळी वाटे न आल्हादक,

जाअी होअुनिया असह्य अगदी जीवास ही शान्तता,
श्वानाचेंचि वुरूनि तों श्रुतिपथीं अस्पष्ट ये भुङ्कणें—
जागे जीव मनीं, जणों धडपडे होकार दे त्या अता—
गेला विस्मरुनी अुषःसमींयचें तें भृङ्गवत् गुञ्जगणें,

तत्रापी न निघेच शब्द, पडला तो स्तब्ध लोकांत की!—
पानें स्तब्ध सुशान्त केळिवरचीं तैशींच ही फाटकीं!



## २१. रामद्वारीं

[ वृत्त शालिनी ]

काशीहूनी मी अयोध्येस जाओ
श्रीरामाच्या मन्दिरीं ध्यान पाहीं,
पाहीं तेथे मी महाराष्ट्रियास,
आनन्दाने चित्त पावे विकास.

पृच्छा केली मी मराठींत त्याला
वृद्धाचा त्या जीव अुत्फुल्ल झाला,
वाटे कोणी लाभला आप्तमित्र
त्या भेटीची माधुरी ती विचित्र.

होतां पूर्वी काय गोदातटींचे ?
सेवेसाठी येथ आला कधींचे ?
वर्षे गेलीं कानपूरांत काही
अन् वार्धक्यीं राहतां रामपायीं ?

पोरेंबाळें तीं कुठे ? कोण कोण ?
साङ्गा पत्ते ठेवितों मी टिपोन,
यात्रेमाजी भेट त्यांचीहि घेतों—
त्याची चर्या पालटे जों वदे तो :—

'माता रामो मत्पिता रामचन्द्रः
स्वामी रामो मत्सखा रामचन्द्रः
सर्वस्वं मे रामचन्द्रो दयालु—
र्नान्यं जाने नैव जाने न जाने'

होती मातें पाठ ती रामरक्षा,
चित्तीं आता जागली ती विवक्षा;
दोघांचीही सम्पली येथ भाषा
लागे रामीं दृष्टि तेथेच आशा.

—२९ जानेवारी, १९३९.

# २२. काही कणिका

[ जाति भूपति ]

१

पाठीस लागुनी पोट छळी मनुजाला
प्रच्छन्न जगावर अुपकारच हा झाला.
पोटाची चिन्ता ज्यां न असे किति थोडे !
त्यांचाही स्वास्थ्यामधे न जाअी वेळ,
मग लावुनि जगतीं आग पाहती खेळ.

२

कोणाची करितां स्तुति, देतां लव दोष
विरजूनी टाकी तो त्याचा सन्तोष;
स्तुति ती तर न्याय्यच, तो अुपकार कशाचा ?
तो दोष तेवढा गमे अवस्त्वारोप—
र्चाचशी व्यक्ति का ? गप्प बैस वा झोप.

३

मित्राशी करितां पैक्याचा व्यवहार
का बरें खचावा मैत्रीचा आधार ?
जर पैका गेला क्षिति न तयाची मोठी—
अुघडकीस येतां वृत्ति हीन अनुदार
स्वारस्य न सख्यीं अुरे, तुटे हुस्सार.

४

[ जाति लीलावती ]

मानवी मनाला दुर्बलता पावली
अन् दोन जन्मलीं अन्ध मुलें जावळीं;
मात्रेचें अेका अन्तर दोघांमधे,

हो प्रसन्न म्हणती देव स्तुतिला तरी
बहिरेंच दैव पण, घ्या करुनी खातरी.

५

तत्त्वार्थ झगडतां झाले जे जे अरी
अुगवूनि घेतला सूड तयांनी तरी
त्या वज्राघातें काळीज न हें पिचे—
सहकार्य जयांशी केलें तत्त्वास्तव
ते कृतघ्न ठरतां होय जिणें रौरव.

६

जे कुकर्म करिती लाज न त्याची तयां
की घडूनि जाअी तें प्रकृति-लीलया;
अन्याय जयाला झाला पण तो जर
मन करिल मोकळें तर त्याचा राग ये,
चिरडिती तया खल मग दुर्लौकिक भयें.

७

का करिशी, म्हणती, शोक असा सम्भ्रमें?
हेमन्तामागुनि वसन्त येअी क्रमें.
पण काय तयाचें समाधान त्याजला
ग्रीष्मांत जलाविण मासा मेल्यावरी
ओढ्यास पूर जरि वर्षा आणी तरी?

८

अमक्यास मिळालें अमुक अैकतां जर
वाअीट वाटलें तर तो का मत्सर?
नृपपदहि तयाला मिळो न वैषम्य तें!

पण देशमुखीची असूनि करीं पात्रता
कशि महारकी ही मुसह्य व्हावी असा ?

९

वाहशी कशाचा गर्व रूपसुन्दरी ?
हें रूप निर्मिलें तूच काय गे तरी ?
पति तुझा असे श्रीमन्त, सर्व जाणती
त्यानेंहि मिळविलें तसें स्वकष्टें धन—
अन् चञ्चल रूपावरीच त्याचे मन.

१०

चारुत्व अुमललें ज्यावरती मन भुले
कोणास न वाटे की व्हावें आपुलें ?
पण पहा ध्रुवान्तर रसिका-रसिकामधे—
कुणि हरी, न लव तो कुसुममनाला गणी,
पाहिजे तर कुणा लागणीस लागणी.

११

मत्सरी मनुष्या, तू काहीही लिही,
हे व्यर्थ शब्द तव, कोण तयांना भिअी ?
वाटते परि मला तुझीच ही काळजी—
गणितील रसिक तुज हीन शारदा-गुणें,
मत्सरक्लेश तरि तव होती का अुणे ?

१२

नव तरुणि, फुलाहुनि तू सुन्दर कोवळी,
भाळून तुझ्यावर हरी तुला जो बळी
राहून तयाच्या अङ्कित आनन्दुनी
रिझवूनि तयाला होणें सुपतिव्रता
याहूनि अधिक का नसेच तव पात्रता ?

१३

प्रियतमा तुजवरी प्रेम करीना कुणी
स्वानन्द म्हणुनि तू का देशी टाकुनी ?
अन् प्रेम कधि कुणा आग्याने का मिळे ?
काहीही घडो, स्मित करणें श्रेयस्कर,
का करावी कुणी कीव ? करो मत्सर !

१४

तुज वादविवादें नच माझी दृष्टि ये,
अन् श्रद्धा आता विदुषींस न ती प्रिये;
तू अबला, तुजवर भार कसा लावूं मी ?
आश्रितालता तू असुख तुला कासया
द्यावीच तिलाञ्जलि मग स्वतत्त्वास या.

---

# २३. अतर्क्य प्रेम

[ वृत्त मन्दाकिनी ]

माझ्याकडे हे पाहती की हा कसा आला अिथे,
आनन्दही चर्या कशी याची खुलूनी दाविते,

बोलावणें गेलें तरी निःसत्त्व शिष्टाचार हा—
भोळाच किंवा धूर्त ये घेअूनि तो आधार हा,

अन् सारिलें प्रेमासवे याला अधिक्षेपें दुरी,
का स्वाभिमानाची छटा नाहीच ती याचे अुरीं,

का ये करूनी घ्यावया वाया स्वतःची वञ्चना—
स्वानन्दमग्ना मङ्गला याच्याकडे पाहीचना,

माला तिच्या कण्ठी पडे बोचे कसा काटा न या,
आशीर्वचांच्या वादळीं का प्रासिती लाटा न या,—

सामान्य लोकदृष्टिचे हे प्रश्न सारे पाहतों
अन् गुङ्गुनी या मङ्गलीं कौतूहलें मी राहतों

अन्याय तू केलास तो होता किती मोठा तरी
त्याहून मोठें प्रेम हें आहे भरूनी अन्तरीं.

तूते करावें अङ्किता प्रेमीं न माझ्या हेतु हा—
सेवा तुझी माझ्या करें होवो अशी होती स्पृहा.

तूते नको सेवा, बरें ! मी ठेवितों ती वक्षता—
अुत्कर्षकालीं ही तुझ्या टाकूं नको का अक्षता !

—२३ अेप्रिल, १९३५.

M. 2643

## २४. ताजमहाल

[जाति प्रणयप्रभा]

जें स्वप्न आजवर मनिं तरळे
त्याहून रम्य हें आज कळे. ध्रु०
यमुना काळी, काळें अम्बर,
वातावरणहि होओी धूसर,
तटीं शान्त हें पाण्डुर सुन्दर
जगत्किल्मिषें हें न मळे. १

अस्पष्टच हें तिमिरामधुनी
दिसे दिसे ज्यापरी सुरधुनी,
ध्येयवादिजननयनापुढुनी
भविष्य मोहक जें न ढळे. २

ढगाआडचा पूर्ण चन्द्रमा
न दिसे फाके परि तत्सुषमा,
पतिव्रतेची प्रीति निरुपमा
स्मृतीमधे जैशी अुजळे. ३

प्रेमाशेचें प्रभातवैभव
पवित्रतेचें निधान अभिनव,
काळ-सागरीं बुडे, विरे तंव
फेसमिषें वर की अुसळे. ४

कालिदास कवितेंतुनि विलसे
अजविलाप तो मधु करुणरसें
वास्तुरूप घे अमर का असें
अुदात्त सुन्दर गूढ वळें. ५

प्रेमाश्रु तुझा वा जगदीश्वर
पडतां पडतां थिजला सत्वर,
विभवहिमाचल झाला भूवर
—का मरणोत्तर हें सगळें ? ६

सुधांशु आता नभीं अनावृत
कुमुद यशाचें तुझिया प्रसृत
करी वरुनि अभिषेकुनि अमृत
मरणाचे मरणत्व गळे. ७

हे का लोकोत्तर जनमानस,
का मृत्युञ्जय मूर्त शान्तरस,
प्रेम अनिर्वचनीय अलालस
काळ पळे पण जें न पळे ! ८

दिसे दिशीं ही सुमनोवेधक,
काय बरें हें ? हाय काळनख !
शाश्वति पुण्यस्मृतीसहि न मग
शल्य हेच हृदयांत सले. ९

—१८ मे, १९३५.

## २५. फोल समाधान

[जाति चन्द्रकान्त]

समाधान व्हावयास म्हणतों, भोग कुणा चुकले ?
समाधान होअिना म्हणुनि हे कोडें नच अुकले.

अर्भक दुर्बल, कोमल निर्मळ यास भोग कुठले ?
कलङ्कच्छटा अितक्यांतच तुज कुठली अिन्दुकले ?

सुमन अजुनि जों उमललें न तों हाय दिसे सुकलें !
वृथा न्हाणणें हृदय पिळवटुनि या प्रेमाश्रुजलें !

वृथा चुम्बणें करुणा भाकित ममत्व हेतु-बळें,
आळवितांना प्रभूस निन्दी विचित्र मन दुबळे.

## २६. सुखरूप आहे ना ग ?

[ ओवी-छन्द-भवबन्ध ]

[ १ ]

सुखरूप आहे ना ग
माझा खेळकर तान्हा
कसा मोतियाचा दाणा
बाळ माझा ; १

सुखरूप आहे ना ग
चेण्डूवाणी टणाटण
उड्या मारूनि अङ्गण
गाजवी जो ? २

सुखरूप आहे ना ग
माझा पण्डित पोपट !
करी प्रश्न पटापट
अवघड ? ३

सुखरूप आहे ना ग
माझा छोटा तानसेन !
अर्थ बोलीं गवसे न
गवयाच्या? ४

सुखरूप आहे ना ग
माझा छान्दिष्ट कुमार
खातो ना ग मञ्जू मार
मायेचा तो ? ५

सुखरूप आहे ना ग
    दिनभर गलबला
करूनिया बिलगला
    रात्रीं तुला ? ६

[ २ ]

सुखरूप आहे ना ग
    माझी बोबडी बाहुली
रानजाईची सानुली
    रूपकळी ? ७

सुखरूप आहे ना ग
    माझी साळुङ्की मञ्जुळ
रानझरी झुळझुळ
    वाहणारी ? ८

सुखरूप आहे ना ग
    माझी हासरी चान्दणी,
मायमाण्डीच्या कोन्दणीं
    हिरकणी ? ९

सुखरूप आहे ना ग
    माझी गौर झोल्यावर
गात ओवी गळ्यावर
    पहिली ती ? १०

सुखरूप आहे ना ग
    चन्द्रज्योतच घरींची
हृदयींच्या झुम्बरींची
    स्नेहप्रभा ? ११

सुखरूप आहे ना ग
    पोर आप्पाशी खेळून
नाना गाऱ्हाणीं साङ्गून
    झोपलेली ? १२

*   *   *

सुखरूप असशी ना
    माझ्या चिमण्यांची आअी
जिच्या जिवावर राही
    निश्चिन्त मी ? १३

—२० मे, १९३५.

---

## २७. कोण्डमारा

[ जाति केशवकरणी ]

नभःपटावर पातळ कोठे दाट पसरलें शिरें
म्लान हो वसुधामुख गोजिरें.

घाम फुटे अङ्गास गद्‌गदुनि जीव होय घाबरा,
हुरहुर गूढ शिवे अन्तरा.

गुदमरणाऱ्या या जीवाची हाक स्वाभाविक
अशी दे साद मधूनच पिक.

अल्प नीलिमा निर्मल तो ही दूर क्षितिजावरी
सुखद जो सखिच्या नयनापरी.

पण का न कोसळुनि पडे अजुनि हें नभ ?
कडकडे का न ती वीजहि अचिरप्रभ ?
कधि सुटेल मादक मातीचा सौरभ ?

कुठे शान्ति जी सर सरल्यावर वातावरणीं विरे,
मुखें नव अवनीवदनीं स्थिरे ?

—८ जून, १९३५.

# २८. अबला रमणी

[ जाति प्रणयप्रभा ]

भयचकित नमी जो तुज रमणी
तुडवीहि तोच का तुज चरणीं ? ध्रु०
विपुल काजळी हे कच मादक,
मृगदृष्टि ही यांना साधक,
स्त्रीत्व अुभारे अुरि हृद्बाधक,
लीन करी युवकास क्षणी. १

ध्येयसृष्टी दिव्य अगोचर
मूर्त जणू तुजमधे मनोहर,
तरुण हुरळुनी जाय खरोखर,
जीवनदेवी तूज गणी. २

यांत अनिर्वचनीय जरी सुख,
क्षणिकच तरि हें मनसिज कौतुक
सृष्टीची बघ गोड फसवणुक—
मृगजलदर्शन रुक्ष रणीं. ३

नर नारीला म्हणुनी देवी
पिञ्जऱ्यांत मैनेपरि ठेवी—
परवशास पण आदर केवी
जरी किति करी लाड धनी— ४

धुन्दी डोळयावरिल निवळतां
ध्यातावें त्या स्वरूप कळतां
प्रेमाची न दिसेच अमरता,
नित्यता न चेतोहरणीं. ५

रमणीस्तव होवोत झुञ्जते
धुन्दफुन्द सुन्दोपसुन्द ते,
त्यास्तव लढती श्वान म्हणुन तें
हाडुक होय न वज्रमणी. ६

दावुनि सुन्दरता दुबळी ती
माया अुपजविणें नरचित्तीं
अर्भकास ती शोभे रीती—
हो सहकारी तू रमणी. ७

सौन्दर्यें नर होय मूढवश,
परिचर्येने कृतज्ञ बहुवस,
होअी कधि तो निष्ठुर नीरस
बघुनि तुझी अश्रुस्मरणी. ८

असलीस जरी त्रिकालजननी
कधिमधि जन लागे भजनीं,
हिरकणीस परि जो मान जनीं
मिळवुं शके न तयास खणी ९

हो व्याघ्रापरि सतेज मादक,
दुबळ्यांचा बघ देवहि घातक,
दुबळेपण तर केवळ पातक
असुं दे सर्वंसह धरणी ! १०

तुझें लतापण, तुझें चन्द्रपण
अवनतीस तव झालें कारण,
स्वावलम्बनाविण अुद्धार न !
झळपव तू अपुला तरणी. ११

—३ जानेवारी, १९३६.

---

# २९. दीपावली

[ सुनीत ]

बाल्याच्या चिमण्या जगांत गमला दीपावलीचा मला
सारा अेकच अर्थ—चार दिन घ्या सुट्टी, वरी चङ्गळ !

साटोऱ्या नि अनारसे नि चकल्या जाअू अता खायला,
चन्द्रज्योति, फटाकडे, भुअिनळे रात्रीं मजा दङ्गल !

होअी व्यापक ते जगत् प्रिय तरी वाटेच दीपावली,
येतां आप्त, सुहृद् नि बन्धुभगिनी हो स्नेहसम्मेलन !

गप्पा, वादविवाद यांतहि मिळे गोडी नवी आगळी,
हास्याचे मग वायबार सुटती माजे मजेचे रण !

दृष्टि व्यापक होय याहुनि तदा वाटे दिवाळी न ही;
गोळीबार, नि सम्प, धर्म-झगडे; भूतेंच की मातलीं !

स्वार्थाचीच जगांत आग धुमसे, कोन्दे धुराने मही.
प्रेमज्योति कुठे न जी अुजळिते राष्ट्रीय दीपावली.

राष्ट्रस्वत्त्व न ज्यांस पार्थिव रुचे त्यांना न दीपोत्सव—
दृष्टी वैश्विक ती खुळावुन बघो व्योमीं निशा-वैभव.

—कोल्हापूर-शाहुपुरी, २४ सप्टेम्बर, १९३९.

# टीपा, शब्दार्थ व स्पष्टीकरण

१ तमी = कृष्णरात्र. ' रमझान् ' महिन्याच्या मागून येणाऱ्या 'शअबान् ' महिन्याच्या द्वितीयेची ही प्रभात आहे. ९० वी रुबाअी पहा — ' दृक्पथी प्रतीक्षित नवेन्दुची ये कोर ' पहिल्या आवृत्तीतील पहिली रुबाअी (परिशिष्ट १) ही मुळास थोडी तरी धरून आहे; परतु तिची ही सुधारलेली आवृत्ति अगदीच स्वतत्र आहे

२ मिथ्या प्रभात, सुब्हि काझिब् = खरी प्रभात होण्यापूर्वी एक तास क्षितिजावर अल्पकाल दिसणारा अुजेड.

४ पाडवा = जम्शीदी 'नव्रोझ् '; वसन्ताचा, सौरवर्षाचा आरम्भ. मार्चची २१ वी तारीख. येशू ( Jesus ), मोशे ( Moses ) , दाविद (David) ही नावे मूळची अिब्री (Hebreu) असल्यामुळे त्याची अीसा, मुसा, दाअूद ही मुसलमान रूपे न देता मूळ अिब्री नावेच दिली आहेत.

५ अिरम = शद्दाद राजाने बसविलेले परन्तु अीश्वरी कोपामुळे पुढे अरबी वाळवण्टात गडप झालेले पुष्पनगर. जम-जाम = जम्शीदचा मद्य पिण्याचा विश्वदर्शी प्याला पहिल्या आवृत्तीत But still the vine has ancient Ruby yields ' परि देअि माणके अजुन पुराण द्राक्षा ' असा पाठभेद आहे.

६ स्तोत्रसहिताकार ' दाविद् ' हा मोठा गायक होता असे मुसल्मान मानितात पह्‌लवी = अिराणातील,' पह्‌लव ' लोकाची भाषा; पक्षीं प्रेमाची (पल्लव = प्रणय, प्रणयकूजन). अिराणात गुलाब फुलण्याच्या सुमारास बुल्बुल येतात व वसन्तान्ती निघून जातात. बुल्बुलाचे गुलाबावरील प्रेम हा फार्सी कवितेतील अेक सुप्रसिद्ध सङ्केत आहे. Incarnadine चा अर्थ तितका यायला हवा असल्यास ' मधुरञ्जित 'च्या अैवजी ' लालबुन्द ' घ्यावा.

८ निशापूर व बाबीलोन ही पूर्वी राजधानीचीं वैभवसम्पन्न शहरे होती.

९–१० कै-कुबाद, कै-खुस्रव व जम्शीद हे अिराणातील प्राचीन

सम्राट् होत. झाल-पुत्र रुस्तम हा अेक भीमकर्मा वीर होता; आणि हातीमताओी हा तर औदार्यांत प्रतिकर्णच होता.

११ सुवर्णासनस्थ सुल्तान् महमूद याच्या मनाला सुखशान्ति नव्हती हे येथे ध्वनित केले आहे.

१२ Who loves not woman, wine and song, He is a fool his whole lifelong. बँटसन्ने ते अुद्धृत केलेले ' लूथर 'चें वचन.

१२अ ही दुसऱ्या आवृत्तीतील १४ वी रुबाओी अितरत्र आढळत नाही.

१३ Credit = पत आणि अुधार. या मुळातील श्लिष्ट शब्दाचे भाषान्तर श्लिष्ट शब्दानी होअू शकले नाही. चौघडा = राजवाड्याच्या नगारखान्यात वाजणारा सत्तादर्शक चौघडा का मृत्यु वाजवीत असलेला कूचाचा नगारा ? मला दुसरा अर्थ अधिक ग्राह्य वाटतो

१४ दौलत; गुलाबातील रेणूस फार्सीत झर् = सुवर्ण म्हणतात; परतु येथे हा शब्द लौकर गळून पडणाऱ्या पाकळ्याना अुद्देशून असावा.

१५ धान = धान्य, विशेषत. भात, हे अितर धान्याहून अधिक पिवळे असतें.

१७ पडशाळा = काही काळ विश्रान्ति घेण्याचे घर. ' राहूनि नेमिली घटिका ' याअैवजी पहिल्या आवृत्तीत Abode his hour or two ' घडि दो घडि राहुनि ' असा पाठभेद आहे

१८ भुजङ्ग हा शब्द यमकासाठी आलेला असला व पडक्या मोठ्या वाड्यांत गुप्त-निधीवर भुजङ्ग व निर्जन ओसाडीत तरसही असतो या न्यायाने येथे त्याचे थोडे औचित्य असले तरी मुळात आधार नाही हें साङ्गितले पाहिजे.

बहिराम गोर = अेक प्राचीन अिराणी सम्राट्.

मुळात ' गोर ' = रानगाढव आहे. येथे अुच्चारसाम्य असलेला गोर ( = A kind of buffalo or deer—*V. S. Apte*) हा शब्द योजिला आहे.

१८अ ही दुसऱ्या आवृत्तीतील २० वी रुबाओी चौथ्या आवृत्तीतील १८ व्या रुबाओीवरील टीपेत फित्झजेरल्डने दिलेली आहे.

१९ अेकच जीव निरनिराळ्या योनीतून हिण्डतो या हिन्दु कल्पनेचा येथें अुल्लेख आहे काय ?

२१ अिराणी कालमानपद्धतीप्रमाणे अुमरच्या वेळी पृथ्वीची अुत्पत्ति होऊन सात हजार वर्षे लोटली होती.

२२ 'ज्या गणी मधूत्तम काळ-शौण्डिक भ्रान्त' हा अर्थ अधिक युक्त होअील काय ? पहिल्या आवृत्तीत That Time and Fate of all their Vintage prest असा पाठभेद आहे

२५ प्रार्थनेची वेळ झाली हे साङगण्यासाठी मशिदीच्या मनोऱ्यावरून जें निमन्त्रण पुकारण्यात येते त्यास 'अझान्' वा 'बाङग' म्हणतात.

२५अ ही दुसऱ्या आवृत्तीतील २८ वी रुबाअी अितरत्र नाही.

२६ Prophet चा अर्थ दूतापेक्षा 'शिष्ट' या शब्दाने अधिक व्यक्त होअील काय ?

२६अ ही रुबाअी पहिल्या आवृत्तीत २६ वी आहे.

२७ चक्रक = Arguing in a circle (in logic)—*V. S. Apte.*

२८ विज्ञान = अैहिक अनुभवजन्य ज्ञान.

३१ त्या काळी शनि हाच अत्यन्त दूरचा ग्रह वाटत होता.

३२ मी-तू = व्यक्तिमत्ता, पृथगात्मता.

३३ बॅट्सन्ने फरीदुद्दीन अत्तारच्या पुढील ओळी अुद्धृत केल्या आहेत:—

O sea why are you blue ?
Why do you wear this robe of mourning ?
There is no fire, why do you boil ?
I weep for my separation from my friend.

३४ 'मी मधील तू' व्यक्तीमधील परमात्मा; हा व्यक्तीस मार्गदर्शक होअू शकत नाही

४०अ ही रुबाअी पहिल्या आवृत्तीत ३७ वी आहे वेळा = पुलिन.

४१ दारू पेल्यात ओतून देणारी पोरगी.

४१अ ही रुबाअी दुसऱ्या आवृत्तीत ४४ वी असून अितरत्र नाही.

४४ हंस = आत्मा. मिअराज = स्वर्गारोहण, हे जिवन्तपणीच अेकदा मुहम्मद पैगम्बराने केले होते असे म्हणतात.

४९ नलिनीदलगत जीवन = Spangle of existence.

"नलिनीदलगतसलिलं तरलम् । तद्वज्जीवितमतिशयचपलम्" ॥

५० अ-कार = फार्सी वर्णमालेत अलिफ् हे प्रथमाक्षर असून ते संन्यासवृत्तीचे प्रतीक मानिले जाते पवित्र ओङ्काराच्या आरम्भीही अ-कारच आहे

'अ-कारो विष्णुरुद्दिष्ट अुकारस्तु महेश्वर ।
मकारस्तु स्मृतो ब्रह्मा प्रणवस्तु त्रयात्मक ॥'

५१ आशेश-शशी = मुळात From Ma'l to Ma'hi', आचन्द्रमत्स्य.

५३अ ही रुबाअी पहिल्या आवृत्तीतील ४५ वी आहे

५७ बारा चान्द्रमास व अेक सौरवर्ष याचा कालमापनात चाङ्गला मेळ घालण्यासाठी निरनिराळ्या ज्योतिषशास्त्रज्ञानी निरनिराळ्या युक्त्या केल्या आहेत.

५८ 'सुराप्रतिग्रहाद्देवाः सुरा इत्यभिविश्रुता ।
अप्रतिग्रहणात्तस्या दैतेयाश्चासुरास्तथा ॥' (रामायण) आपटे कोश.

५९ अिस्लामात परस्परविरोधी असणाऱ्या पन्थाची सङ्ख्या ७२ आहे असें म्हणतात.

६२अ ही रुबाअी दुसऱ्या आवृत्तीत ६५ वी असून अितरत्र नाही

६६ तपन = अेका नरकाचे नाव.

६८ फानूसि खियाल = अश्विन वद्यात बाहेर उम्बऱ्यावर लावावयाचा कागदी कन्दील.

७१अ ही रुबाअी दुसऱ्या आवृत्तीत ७७ वी असून अितरत्र नाही.

७५ मुश्तरी आणि पर्वीन् = गुरु आणि कृत्तिका.

७६अ ही रुबाअी फित्झजेरल्डने आपल्या प्रस्तावनेत दिली आहे.

७९ ही दुसऱ्या आवृत्तीत ८५ वी रुबाअी असून दुसऱ्या आवृत्तीतील ८६ वी रुबाअी अितरत्र नाही ती पुढीलप्रमाणे —

Nay, but for terror of his wrathful Face,
I swear I will not call In-justice Grace,
Not one good Fellow of the Tavern but
Would kick so poor a coward from the place.

८२ रमजान महिन्यात दिवसा रोज मुसल्मानाना अुपवास म्हणजे रोजा असतो.

८३ या रुबाओीअैवजी दुसऱ्या आवृत्तीत पुढील रुबाओी आहे :—.

And once again these gather'd a scarce-heard,
Whisper among them, as it were, the stirr'd
Ashes of some all but extinguish't tongue,
Which mine ear kindled into living word

९० वस्तुत पारणे हे नवेन्दु दिसतो त्याच्या दुसरे दिवशी असतें त्यास रमजान-अिद म्हणतात. या रुबाओीवर टीप लिहितांना फित्झजेरल्डने पुढील अेक रुबाओीचे भाषान्तर दिले आहे.

Be of Good cheer—the Sullen Month will die,
And a young Moon requite us by and by:
Look how the old one meagre bent and wan
With age and Fast is faining from the sky.

सम्पेल हास बा, सङ्कष्टी हा मास
अन् बालचन्द्र देअील सुफल आम्हास
बघ कसा कृश जराभारानमित शशी हा
निस्तेज होत नभि जाओी निजधामास

९१अ ही रुबाओी दुसऱ्या आवृत्तीत ९९ वी असून अितरत्र नाही.
९८अ ही रुबाओी दुसऱ्या आवृत्तीत ११७ वी असून अितरत्र नाही.

